## — पुनःपरिचय —

जगप्रसिद्ध रशियन कादंबरीकार महर्षि टॉल्स्टॉय् यांच्या '**क्रॉयटझर सोनाता**' (Kreutzer Sonata) या कादंबरीच्या मराठी अनुवादाची ही दुसरी आवृत्ति प्रसिद्ध होत आहे. अर्वाचीन रशियन कादंबरीवाङ्मयाने युरोपीय कादंबरीवाङ्मयात अग्रस्थान मिळविले आहे. आणि रशियन कादंबरी लेखकातहि महर्षि टॉल्स्टॉय् याची बरोबरी अद्याप कोणी करूं शकलेला नाही. जगद्विख्यात फ्रेंच कादंबरीकार रोमॉरोलॉ हे टॉल्स्टॉय् याच्या कलाकृतींना अनुपम मानीत; रशियन् क्रान्तीचा प्रणेता लेनिन् हा भिन्न विचारसंप्रदायाचा असूनहि टॉल्स्टाय् याच्या वाङ्मयाचे अपूर्व सामर्थ्य मान्य करी; आणि स्वतंत्र हिंदुस्थानचे जनक महात्मा गांधी हे आपल्या जगद्विख्यात अहिंसातंत्राच्या क्षत्रात टॉल्स्टॉय् यास गुरुस्थानी मानीत. एवढे सांगितल्यावर टॉल्स्टॉय् याच्या कलेचे आणि विचाराचें अधिक महत्त्व सांगण्याची गरज नाही.

तथापि बोधवादी वाङ्मय म्हणून मराठींत जे कृतिम, रडवें वाङ्मय खपविल जाते, त्यावरून या कादंबरीच्या अन्तरंगाची कल्पना करणें चूक होईल. किंबहुना टॉल्स्टॉय याचे नाव या कादंबरीवर न छापता तिची एखादी आवृत्ति काढल्यास ती गांधीवादी अगर नीतिवादी आहे हें लक्षांत येण्याचें तर दूरच राहो—ती अश्लील आणि अनैतिक आहे असेंहि कित्येक नीति-पूजक टीकाकारास वाटण्याचा संभव आहे!

या कादंबरीची वात दोन शब्दांत सांगायची झाली, तर 'क्राइम स्टोरि' (गुन्ह्याची हकीकत) म्हणून तिचें वर्णन

करता येईल. एका प्रतिष्ठित घराण्यातील स्त्रीचा आपल्या संगीत शिक्षकाशी असलेला प्रेमसंबंध तिच्या पतीच्या नजरेस येतो व अखेर तिचा पति तिच्या पापी प्रियकरासमोर व आपल्या मुलालेकरासमोर तिचा खून करतो, हा या कादंबरीचा कथाभाग होय कादंबरी लहानच म्हणजे एखाद्या दीर्घ कथेसारखी दीड-दोनशे पानांची आहे. कादंबरीचा 'खुनी' नायक, एका विशिष्ट प्रक्षुब्ध मनःस्थितींत ही हकीकत स्वतःच सांगत आहे.

पण या प्रक्षोभक कबुलीजबाबाच्या ओघात खून आणि व्यभिचार या दोहोसंबंधीहि नवा दृष्टिकोण पत्करूनच वाचक बाहेर पडतो—एवढा या दीडशें पानाचा प्रभाव आहे! व्यभिचार हे मोठे पाप तर खरेच; पण त्या महापापाबद्दलहि प्रायश्चित देण्याची लायकी सर्वसाधारण सुखवस्तु अशा गृहस्थाची बहुधा नसते आपण घाणीत लोळत असताहि आपली बायको मात्र धुतल्या तांदळासारखी असावी—हा आपल्या खानदानपणाचा एक हक्कच आहे—अशीच, ज्याना आपण प्रतिष्ठित म्हणतो त्याची पुष्कळदा समजूत असते व अशा प्रतिष्ठित मनुष्यानें व्यभिचार डोळ्यानी पाहिल्यावर रागाच्या भरांत आपल्या व्यभिचारी स्त्रीचा खून केल्यास आपणां 'अब्रूदार' मंडळींची सहानुभूति अर्थात् त्या पतीच्याच बाजूला असते.

तेव्हा प्रत्यक्ष असा खून करणाऱ्या मनुष्याला स्वतःविषयीं व स्वतःच्या कृत्याविषयीं काय वाटतें, हें एकदा पाहून घेणें बोधप्रद आहे यात शंका नाहीं.

एखादें महत्कृत्य—मग तें पुण्य असो कीं पाप असो—केल्यानंतर मनुष्याला नवा साक्षात्कार घडतो. या कथेंतील नायकाला खून करून मोकळा झाल्यावर तीन गोष्टी कळून आल्या. खून

करूनहि आपण बायकोला काहीच शिकवूं शकलों नाहीं; आपण खून केला तो केवळ आपल्या बायकोचाच केला नाही तर आपल्या अश्राप अर्भकाच्या मातेचाहि केला ! आणि तसेंच पाहूं गेल्यास बायकोच्या मानानें आपण मोठेसे पवित्र होतों असेंहि नाही.

आणि ही कादंबरी वाचून थोडा विचार करणाऱ्या प्रत्येक वाचकास असे कळून येईल की हिंसेन काहींच साधत नाहीं— सूड घेणे देखील साधत नाहीं ! आणि हिंसा टाळायची असेल तर वैषयिकताच सोडायला हवी ! अर्थात् या दोन साक्षात्कारांतच संपूर्ण गांधीवाद साठवला आहे, असे म्हटले तर फारशी चूक होणार नाही. पण हे साक्षात्कार प्रत्यक्ष अनुभवातूनच मिळणारे आहेत टॉल्स्टॉय् सारख्या असामान्य कलावन्तांचें अपूर्वत्व तें हें, की कलेच्या जोरावर ते आपणास प्रत्यक्ष जीवनाचा अनुभव प्राप्त करून देतात. ही कादंबरी वाचल्यानंतर वाचकाला, प्रत्यक्ष खून आणि खुनी, पाहिल्यासारखें वाटेल. ती कादंबरी तो पुनः वाचील व तिजवर विचार करील. व नंतर जीवनावर विचार करील व आपल्या तकलुपी नीतिकल्पनांचें विसर्जन करून खऱ्या नीतीचा अंगिकार करील.

" ही कादंबरी वाचक पुनः वाचील ! " या एका वाक्यांतच या कादंबरीचें वेगळेपण सांगितल्यासारखें झाले. आजकालच्या मराठी वाङमयातील प्रसिद्ध कादंबऱ्यांपैकीं अशा किती आहेत, की ज्या आपणास दोनदा वाचाव्याशा वाटल्या ? आणि ज्यांनी आपणाला आपल्या जीवनविषयक कल्पनांचा फेरविचार करावयास लावला ? याचा वाचकांनी विचार करावा. हरीभाऊ आपट्यांच्या कादंबऱ्या अथवा 'वाईकर भटजी' सारखी एखादी सुंदर

रूपांतरित कादंबरी सोडली, तर 'लोकप्रिय' आणि 'प्रसिद्ध' कादंबऱ्यात तरी अशा कादंबऱ्या पाच देखील निघणार नाहीत असे म्हणण्यास हरकत नाही.

'वांईकर भटजी' या चिंतनपर कादंबरीने मराठीतील 'शाश्वत' वाङ्मयात स्थान मिळविले, तसेच स्थान या प्रक्षोभक कादंबरीसहि मिळण्यास हरकत नाही. ज्याना महात्मा गांधींची तत्त्वे ललित वाङ्मयाच्या द्वारे समाजाला सांगण्याची इच्छा आहे, त्यानीं तर ही भीषण कथा कित्ता म्हणून डोळ्यासमोर ठेवण्यास हरकत नाही. ज्याना वास्तववाद व मनोविश्लेषण यांचा उत्कृष्ट नमुना पहायचा असेल, त्यानीहि या कादंबरीचें एकाहून अधिक वेळा वाचन करणे जरूर आहे.

श्रीमंत भाऊसाहेब मंत्री हे टॉल्स्टॉय् याच्या वाङ्मयाचे भक्त आहेत. या भक्तीचे रूपांतर वाङमयसेवेत झाले, ही गोष्ट त्यांच्या निष्ठेची द्योतक आहे.

२९-१२-४८<br>
तुकाराम आश्रम<br>
टिळकवाडी पुणें २.

श्रीकृष्ण के. क्षीरसागर

# जारिणी

## — १ —

वसंतऋतूस नुकताच आरंभ झालेला होता. आमचे दोन दिवस व एक रात्र आगगाडीतच गेली होती. जवळपासचे उतारू गाडीत चढतउतरत होते. माझ्याशिवाय त्या डब्यात आणखी तीन उतारूं मात्र प्रथमपासूनच होते. त्यात एक बाई होती. ती तरुण अगर मोहक नव्हती. ती सारखी सिगारेट ओढत असे. तिने अंगावर पुरुषाचा मोठा ओव्हरकोट घातला होता. दीर्घकाल भोगलेल्या दुःखाच्या छटा तिच्या चेहऱ्यावर स्पष्ट दिसत होत्या. तिच्याच शेजारी तिच्या ओळखीचा व बराच बोलभांड एक गृहस्थ बसला होता. वय अजमासे चाळीसचें सुमारास असेल. त्यानें अत्यंत सुंदर व आधुनिक फॅशनचे कपडे घातले होते. त्याच्यापलीकडे एक बुटकेलासा, बावऱ्या व भेदरट नजरेचा तरुण होता. मी तरुण म्हटलं खरं, पण त्याचे सर्व केस अकालीच पांढरे झालेले दिसत होते. त्याची नजर चंचल होती व तो इतर उतारूंशी जरा फटकून व तुसडेपणानेंच वागत होता.

जरा भारी किंमतीचाच ओव्हरकोट त्या मनुष्याच्या अंगावर होता. त्या कोटाच्या कॉलरला मऊ रेशमी फर लावलेली

होती. व डोक्यावर फरचीच टोपी होती. ओव्हरकोटाच्या सुटलेल्या बटनातून आतलं जाकीट व रेशमी शर्ट दिसत होता. मधून मधून घशातून खोकल्यासारखा किंवा खाकरल्यासारखा आवाज काढण्याची त्यास संवय होती सबंध प्रवासात त्यानें एकदाही कोणाशी ओळख केली नाहीं अगर बोलण्याचा प्रयत्न केला नाही. उलट तो इतराना टाळण्याचाच प्रयत्न करीत असे. कोणी विचारलं तर त्यास तुटक उत्तर देऊन तो त्यास निरुत्साही करीत असे. वाचत बसणं, खिडकींतून बाहेर पाहणं अगर स्वतःपुरताच एकादा खाण्याचा जिन्नस घेऊन खात वसणं अगर चहा पिणं, एवढाच त्याचा उद्योग चालला होता. त्याच्या या एकलकोंडेपणामुळें त्याला त्रास होतो आहे हे मला स्पष्ट दिसत होते. म्हणून मी एकदोनदा त्याचेशी बोलण्याचाही प्रयत्न केला. शिवाय तो माझ्या समोरच बसला असल्यामुळे नेहमी नजरानजर होई, पण तो त्याच वेळी चेहरा दुसरीकडे करी--एखाद्या पुस्तकात डोकं खुपसून बसे किंवा खिडकीतून उगीचच बाहेर पाहण्याला सुरवात करी.

प्रवासाच्या दुसऱ्याच दिवशी संध्याकाळी आमचे हे एकलकोंडे व बावरे वीर स्वतः चहा करावा म्हणून पाणी आणण्याकरिता गेले जंक्शनवर गाडी बराच वेळ थाबणार म्हणून दुसरे चाळीशीच्या घरांतले ते फॅशनेबल—ते वकील होते असं मला मागाहून कळलं—घशाचं धुरकांड करणाऱ्या त्या बाईला घेऊन चहा पिण्यास गेले. मध्यंतरी आमचे डब्यात नवीन उतारू बरेच चढले. त्यातच गुळगुळींत दाढी केलेला जरा

उंचेलासा एक म्हातारा व्यापारीही चढला वाढत्या वयोमानाप्रमाणे त्याच्या चेहऱ्यावर सुरकुत्या पडल्या होत्या. त्याने एक उबदार ओव्हरकोट अंगावर घातला होता व उंच टोपी त्याच्या डोक्यावर होती. वकील आणि बाई ज्या कोचावर बसली होती, त्याच्या समोरच या व्यापाऱ्याने आपलें आसन थाटलं व शेजारीच असलेल्या तरुणाशी—बहुतेक हा व्यापाऱ्याचा मुनीम असावा—गप्पा झोडण्यास सुरुवात केली. तो तरुणही याच स्टेशनवर चढला होता.

व्यापाऱ्याच्या समोरच्याच बाकावर, पण जरा बाजूला मी बसलेला असल्यामुळे अधून मधून त्या दोघांचं संभाषण माझ्या कानी पडे. अर्थात् प्लॅटफॉर्मवरची गडबड व गोंधळ जरा कमी असला म्हणजे बोलणं स्पष्ट ऐकू येत असे. व्यापाऱ्यान आपण पुढच्याच स्टेशनवर उतरणार असल्याच व तेथे आपली बरीच स्थावर मिळकत आहे, तिकडे जात असल्याचं आपणहून सांगितलं. नंतर नेहमीप्रमाणं बोलण्याचा ओघ, व्यापाराची स्थिती, तेजीमंदी, जिन्नसाच्या किंमती यांकडे वळला. जवळच असणाऱ्या यात्रेबद्दल त्याच्यात बोलण सुरू झाल. तरुण मुनीमान यात्रेतील निरनिराळ्या दुकानाची वर्णनं करण्यास सुरवात केलीं व एका श्रीमंत गृहस्थानं दारूच्या नादात केलेले पराक्रम तो सांगणार, इतक्यात त्या म्हाताऱ्या व्यापाऱ्यानं त्याच बोलणं थांबवलं व आपल्या तरुणपणाच्या अशाच यात्रेतल्या लीला सांगण्यास सुरवात केली. मोठ्या अभिमानाने तो आपल्या गद्धेपंचवीशींतले चाळे सांगत होता.

शेवटी त्यानं व मुनीम सांगत असलेल्या श्रीमंतानं दारूच्या नादात केलेली गमत तर त्याला कानातच कुजबुजावी लागली. त्याबरोबर मुनिमाच्या हसण्यानं सर्व डबा दणाणून गेला, व व्यापाऱ्याचेही दोन दात हसताना दिसूं लागले. त्याच्या बोलण्यात मला काहीच मौज वाटेना, म्हणून मी प्लॅटफार्मवर जरा हिंडण्याचा विचार केला. पण दाराशी जातों तोंच वकिलाचे पुढील शब्द माझ्या कानी पडले "छेः, आता वेळ नाही. दुसरी घंटा झालीसुद्धा.".

त्याच म्हणण बरोबर होतं. कारण एक चक्कर मारून मी परत डब्याजवळ येण्याला आणि घंटा व्हायला एकच गाठ पडली. डब्यात वकील आणि ती बाई याचं सारखं बोलणं सुरूच होतं. म्हातारा व्यापारी टक लावून ते बोलणं ऐकत होता व वेळ प्रसंगी बोलण पटलं नाही कीं, नाक मुरडीत होता. शेवटी तिनं आपल्या नवऱ्याला स्पष्ट सांगितलं वकीलसाहेब हसत सांगत होते. याच वेळी मी आपल्या जागेवर बसण्याकरिता त्याचे समोरुन जात होतो, "की आपण यापुढें तुझ्याजवळ राहू शकत नाही राहण्याची इच्छा नाही. कारण .." यापुढची वाक्यं मात्र मी ऐकली नाहीत. उतारूंची गडबड सुरू झाली. तिकिटकलेक्टर याच वेळी आत आला. सामानाच्या हिसकाहिसकीनें आवाज ऐकूं येईना. थोड-क्यांत म्हणजे त्याचें पुढचं बोलणं माझ्या कानीं पडलं नाही.

थोडी शांतता झाली, त्यावेळी वकील साहेबाचं बोलणं पुन्हा कानीं पडलं, पण त्याचे बोलणें खाजगी विषयाकडून

सार्वजनिक विषयाकडे वळलं होतं. युरोपभर घटस्फोटाच्या प्रश्नाकडे जनतेचें हल्ली लक्ष लागलें आहे व रशियातही हल्ली फार घटस्फोट होतात; असे वकील साहेब सांगत होते, पण ह्याच वेळी आपणच सारखे बोलतो आहो व दुसऱ्यास बोलण्याची व विचारण्याची संधि देत नाही हें लक्षात येऊन त्यानी म्हाताऱ्या व्यापाऱ्यास विचारले, "काय हो! पूर्वी असे घटस्फोट नसतील? का होते?" व्यापारी काही तरी उत्तर देणार होता तोच गाडी सुरू झाली होती. नुकतेच दिवे लागले होते म्हणून त्याने तोंडातल्या तोंडात प्रार्थना म्हणावयास सुरुवात केली. वकिलाने आपली नजर बाजूला वळविली व ते उत्तराची उत्सुकतेने वाट पहात बसले. व्यापाऱ्याने आपली प्रार्थना संपविली. दिव्यास नमस्कार केला शेजारच्या उतारूना नमस्कार केला आणि मांडी घालून जरा व्यवस्थित बसून बोलावयास सुरवात केली, "अहो, पूर्वीसुद्धा अनेकदा असे होतच असे, पण पूर्वी इतकी खादेपालट नव्हती, पण आता मात्र जे चालू आहे तेंच बरोबर आहे; कारण हल्ली लोकच फार चिकित्सक झालेले आहेत.

गाडी वेगाने चालली होती. चाकाची खडखड सुरू झाली होती, त्यामुळे त्याच बोलणं कानीं पडेनासं झालं. पण ऐकण्याची जिज्ञासा मात्र असल्यामुळे मी त्याच्या जरा जवळ सरकलो. आमचे शेजारी ते बावरे सद्गृहस्थ त्यांचेंही त्या गोष्टीकडे लक्ष गेलेले दिसले. मात्र त्यानी आपली

जागा न सोडता तेथूनच कानटवकारून ऐकण्यास सुरवात केली.

"पण शिक्षणाकडे असा दोष तरी काय?" ती बाई किंचित हसत विचारत होती. "एकमेकाचे तोंड सुद्धा न पाहता लग्न करावे, असे तर तुम्ही म्हणणार नाहींना?" बायकांच्या नेहमीच्या पद्धतीप्रमाणे त्या बाईच्या बोलण्यात प्रश्न विचारण्यापेक्षा उलट शंका घेतली जाईल त्याला आधींच उत्तर देण्याची प्रवृत्ति जास्ती दिसली, "एकमेकाना आपण आवडतो कीं नाही, एकमेक आपण आनंदात राहूं शकूं कीं नाही ह्याचा विचारमुद्धा न करता ते लग्न करायचं आणि जन्मभर दुःख भोगायच. तरी तीच स्थिति चांगली असेच तुमचे मत ना?" ती वकिलाकडे आणि माझ्याकडे पाहून बोलत होती, पण खरोखरी त्या म्हाताऱ्यालाच तिने हे प्रश्न विचारले होते.

"बाकी खरोखरी हल्लीं लोक कमालीचे चिकित्सक झालेले आहेत बोआ!" व्यापाऱ्यानें पुन्हा तेच वाक्य उच्चारलें. त्या बाईकडे तिरस्कारानें पाहिले, पण तिच्या प्रश्नाचें मुळी उत्तरच दिले नाहीं!

"अहो, पण शिक्षणानें तुमच्या लग्न-संस्थेत काय गोंधळ घातला ते तर एकदा सांगा" वकीलसाहेब हंसत हंसत म्हणाले व्यापारी बोलण्याच्या बेतात होता, पण बाईनी मध्येंच तोंड घातलं " जुनं ते सोनं हे दिवस गेले. आता— विसरा म्हणावं त्या गोष्टी!" वकिलाना हे बोलणें आवडलें नाहीं, त्यानी नजरेनेच बाईस गप्प बसविले. आणि म्हणाले

"अहो, पण त्यानात्याचं काय म्हणण असेल ते माडूं द्या की!"

"हल्लीचे शिक्षण म्हणजे शुद्ध गाढवपणा आहे!" व्यापाऱ्याने जरा तोऱ्यात व अधिकारातच उत्तर दिले!

"प्रेम नसलेल्या दोन जीवाची तुम्हीं लग्न-गाठ बाधावयाची व ते आनंदात दिसले नाहीत म्हणजे तुम्हांस आश्चर्य वाटावयाचं!" गडबडीने त्या बाईने वकिलाकडे-माझ्याकडे आणि मुनिमाकडे पहात उत्तर दिले. बाकी मुनीमसुद्धा आपल्या जागेवर जरा रेलून हंसत इकडेच कान देत होता. "जनावराना तुम्ही असे वागवता तें ठीक!" व्यापाऱ्याला टोमणा मारण्याचा उद्देशानें ती बाई म्हणाली, "जनावरांचीं लग्नें लावताना त्याची संमति घेऊं नका, पण आम्ही माणसे आहोत. स्त्री-पुरुषाना काही भावना, आकाक्षा, अपेक्षा असतात!"

"ह्या बोलण्यात काय अर्थ आहे. अहो, जनावर ते जनावर, पण माणसाना नीति-नियम काही तरी आहेतच!" एकाद्या तत्त्ववेत्त्याप्रमाणे व्यापारी बोलला

"अहो, पण प्रेम नसताना त्या माणसाबरोबर जन्म कसा काढायचा?" जवळजवळ ती बाई ओरडलीच! आणि 'प्रेम' वगैरे शद्ब आपण प्रथमच शोधून काढले असा तिच्या बोलण्याचा अविर्भाव होता.

"प्रेमाबिमाला पूर्वी मुळीच किंमत नव्हती!" व्यापाऱ्यानें खरपूस उत्तर दिलें, "अहो प्रेमाचा रोग हा नवीन निघाला आहे आणि हल्लीच त्याची साथ बळावली आहे. जरा कुठें खुट्ट झाले की बायको कडाडलीच, 'मला तुझ्याबरोबर नादा-

यचं नाही म्हणून ' अहो, ही साथ शेतकऱ्यांत व अशिक्षितातसुद्धा बळावली आहे. एकादी शेतकऱ्याची बायकोसुद्धां त्याच्या तोंडावर लुगडं-चोळी फेकून दुसऱ्याचा हात धरून जायचं म्हणते-आणि कारण काय, तर म्हणे नवऱ्याला टक्कल आहे व हिला उलटे केस केलेला सापडलाय! आता ह्याच्याहून जास्त आश्चर्य काय राहिलें? बायकांचा खरा सद्गुण म्हणजे त्याना लज्जा पाहिजे, त्याना नवऱ्याबद्दल आदर आणि भीति वाटली पाहिजे!"

मुनीम स्वतःला आलेलं हसं दाबीत क्षणात वकिलाकडे, तर क्षणात त्या बाईकडे, तर क्षणात माझ्याकडे पहात होता. आणि व्यापाऱ्याच्या बोलण्याचा जो परिणाम होईल त्यात साक्ष देण्याची त्याची तयारी दिसली एकंदरीत हो स हो ठोकणारा इसम दिसत होता.

"कशा प्रकारची भीति वाटावी?" बाईने विचारले.

"कसली म्हणजे! मी म्हणतो तशी! 'अगदी भर्ता रक्षति यौवने" असा धाक-अशी भीति वाटली पाहिजे!"

"त्या पुराणातल्या गोष्टी विसरा आता, समजलं" बाई जरा कठोर आवाजात बोलली.

"बाई,! तशी गोष्ट नाही. सोन्यासारखी तत्त्वं कधीच नाहीशी होत नसतात. स्त्रीचा जन्म पुरुषामुळे व पुरुषाचा जन्म स्त्रीमुळं, ही अबाधित गोष्ट आहे. अहो, मी तर म्हणतो, परमेश्वरानं आधी पुरुष निर्माण केला व त्याच्याच उरलेल्या मातीतून त्यानं स्त्री निर्माण केली. एकंदरीत काय, तर जगाच्या

अंतापर्यंत स्त्री ही अशीच राहणार!" व्यापाऱ्याने जरा गंभीरपणानं सांगितलं, आणि आपलाच विजय झाला अशा तोऱ्याने मानेला असा काही झटका दिला की, मुनिमाला पटल की, व्यापाऱ्याचाच विजय आहे व त्याला हास्याच्या उकळ्या फुटूं लागल्या.

"हो! तुम्हा सगळ्या पुरुषांचीच याबाबद बोलण्याची ही पद्धत ठरून गेली आहे" हार न जाण्याच्या हट्टाने व आमच्याकडे दुर्लक्ष करीत ती म्हणाली, "तुम्हा पुरुषांना तेवढं स्वातंत्र्य आणि बायकांच्या कपाळी मात्र बंदिवास काय? स्वतःला वाटेल तसं वागायला मिळावं याच्याबद्दल तेवढी मारखी काळजी वाटते तुम्हाला– नाही?"

"म्हणजे आम्हाला तशी कोणी परवानगी देतो असं थोडंच आहे! पण पुरुषाच्या स्वैराचारानं, क्वचित गैरवर्तनानं "घरात" काहीच फरक पडत नाही. पण समजा, एकादी स्त्री–एकाद्याची बायको–अशी वागली तर! अहो, कांचेचं भांडं केव्हा तडा जाईल याचा नेम नाही."

क्षणभर त्या बाईलासुद्धा आपला पराजय झाला असं वाटल, पण ती हार जायला तयार नव्हती!

"अहो, पण काही असलं तरी स्त्री म्हणजे तरी एक माणूसच आहेना!! तिला पुरुषाप्रमाणें भावना का असू नयेत? समजा, तिचं नवऱ्यावर प्रेम नसल तर तिनं काय करावं?"

"नवऱ्यावर प्रेम नसलं तर काय करावं?" रागानें ओठ थरथरत, भिवया वर चढवून व्यापाऱ्यानें विचारलं, "काही

नाही हरकत! नवऱ्यावर प्रेम करायला शिकाव, शिकेल ती."
अनपेक्षित युक्तिवादाने मुनिमाला मनातल्या मनात गुदगुल्या वाटल्या व संमतीदर्शक तो काही तरी अस्पष्ट बोलला

" इश्श ! पण ती जर प्रेम करायला शिकली नाही तर !" बाई बोलली, " आणि जर प्रेम नाही तर जबरीनं काही प्रेम निपजणारं नाही ? "

" पण समजा, एखादी स्त्री नवऱ्याशी एकनिष्ठ राहिली नाही, तर मग ? " वकिलानी विचारलं

" पण, त्याचा विचारच तुम्ही का करता कळत नाही. पण ती तशी बिघडणार नाही अशी सुरुवातीपासून खबरदारी घेतली की सपलं काम ! "

" होय ! पण तुम्ही काळजी घेऊनसुद्धा ती बिघडली, तर मग ? मी म्हणतो तशी गोष्ट घडली असं गृहीत धरून चाला मग पुढे काय ? "

" कोठे असं होत असेल ते होवो बाबा, पण आमच्या तर ऐकिवात अशी गोष्ट नाही ! " व्यापाऱ्यानें उत्तर दिले,

सर्वच मंडळी गप्प बसली. मुनीम मात्र स्वतःची जागा सोडून जरा जवळ आला आणि आपणच बोलायचं राहिलों—( असं वाटू नये )—अस वाटून त्यानं सागण्यास सुरवात केली, " आता आमच्याच गावची हकीगत ऐकाना ! जरा बदनामीकारक आणि भानगडीचीच आहे पण आपल्याला तर बोवा यात काहीच बोध होत नाही बाकी ती बाई जरा तऱ्हेवाईकच ! वागणुकिनं, नीतीनं आपली अशीतशीच

म्हणाना ! जरा भटकण्या–सवरण्याचा नाद ! तिचा नवरा गमत्या ( सावध ) मोठा मोकळ्या मनाचा नि मनमिळावू माणूस ! प्रथम तिनं दुकानातल्या पोऱ्यार्शीच संधान बांधलं. नवऱ्यानं तिला वाटेवर आणण्याचा बराच प्रयत्न केला. सांगून–सवरून पाह्यलं धाकदपटशा दाखवला, पण काय ? पालथ्या घागरीवर पाणी ! अमूक एक गोष्ट करायची अशी तिनं बाकी ठेवली नाही. शेवटी शेवटी तर नवऱ्याच्या खिशावरसुद्धा ती झडप घालूं लागली. नवऱ्यान उभी आडवीसुद्धा केली, पण काय झालं ! अहो, ती जी एकदा भकली ती भकलीच बघा ! एका मुसलमानाचा हात धरून ती पळून गेली. आता मी विचारतो, तिच्या नवऱ्यानं काय करायचं बाकी ठेवलं होतं ? शेवटीं घरातून घालवून स्वतः एकटा राहिला आहे आणि ती मात्र गटार–गंगेत लोळतच आहे !"

"मूर्ख लेकाचा !" व्यापाऱ्यानं उत्तर दिलं "प्रथमपासूनच उठता लाथ बसता बुक्कीचा खुराक आणि नाकात ठेवली असती वेसण म्हणजे काय बिशाद होती. अहो ! मी सांगतो असं तो वागला असता तर, ती गरीब गाय होऊन राहिली नसती तर मी मिशी उतरून देण्यास तयार आहे. म्हणतात ना की, "रानातला बैल आणि घरातली बाईल" याच्यावर शाहण्यानं विश्वास ठेऊं नये. का ? खरं की नाही ?"

याच वेळीं तिकिट कलेक्टर आत आल्यामुळें त्यांचं बोलणं तितकंच थांबलं. म्हाताऱ्यानं आपलं तिकीट दिलं आणि म्हणाला, "अहो साहेब, बायकाना प्रथमपासूनच ठोका नाहींतर सर्वस्वाला मुका–( धोका )–समजलात."

"पण कायहो, मघाच्या तुमच्या यात्रेतल्या गंमतीबद्दल बोलणं आणि आताचं बोलणं याचा ताळमेळ कसा घालायचा?" मला अगदीच गप्प बसवेना म्हणून मी विचारलं!

"हो! हो! ती अगदीच निराळी बाब आहे!" व्यापाऱ्यानें उत्तर दिलं आणि तो अगदी गप्प बसला. इतक्यात स्टेशनही आलं, व्यापाऱ्यानं बाकाखालची ट्रंक ओढून घेतली, स्वतःचा ओव्हरकोट अंगावर घेतला आणि स्वारी प्लॅटफॉर्मवर जाऊन उतरली.



तो म्हातारा व्यापारी डब्यातून बाहेर पडला असेल नसेल तोंच, पुन्हा सगळ्यांच्या बोलण्याची एकच धुमाळ उडून गेली.

"एं हं! ते पहा, आदिपुरुष वृद्धकपी!" मुनिमानें सुरवात केली.

"पण इतकं कशाला! गृहव्यवस्थेवर वरवंटा फिरवणारी जुल्मी सत्ताच माणूसरूपानं वावरत आहे म्हणा की!" बाईंनी अनुमोदन दिलं, "स्त्रियांच्याबद्दल आणि लग्नाबद्दल किती गावढळ कल्पना आहेत थेरड्याच्या!"

"खरं आहे! इंग्रजांच्या लग्नाबद्दलच्या सुधारणापासून आपण अजून बरेच दूर आहोत" वकिलांनी टेकू दिला.

"पण मी म्हणते जिथं प्रेम नाही ते लग्नच नव्हे. हे कसं या लोकांच्या लक्षात येत नाही याचंच आश्चर्य वाटतं मला! लग्नाचं पावित्र्य वाटण्याचं कारण म्हणजेच प्रेम, आणि जर तें प्रेममूलक असेल तरच तें खरं लग्न!"

मुनीम अगदी लक्ष लावून ऐकत होता व हंसत होता. पुढे मागं स्वतःच्या उपयोगीं पडतील अशा प्रबुद्ध कल्पना तो ऐकून ठेवीत होता. बाई बोलत असतांना हसं किंवा हुंदका दाबल्यासारखा आवाज ऐकूं आला होता आणि बाजूला वळून पाहतो तर पिकलेल्या केसाचा, भेदरट वृत्तीचा, माझ्या शेजारचा एकलकोंडा उतारू आमच्या बोलण्यात लक्ष लागल्यामुळें आमचे जवळच आला होता; पण बोलण्यात रंगल्यामुळें आमचे मात्र तिकडे लक्ष नव्हते. बाकाच्या पाठीवर हात ठेवून तो उभा होता. त्याचा चेहरा लाल झाला होता, भेदरट वृत्तीची सर्व चिन्हं त्याचे चेहऱ्यावर स्पष्ट दिसत होती व एकंदर त्याची वृत्तीच थरारल्यासारखी दिसत होती.

"कशा प्रकारचे प्रेम म्हणता तुम्हीं? कसल्या प्रेमामुळ लग्नाला पावित्र्य येते?" जरा अडखळतच त्यानें विचारले

त्याचा चेहरा, बावरलेली व कष्टी ती मनःस्थिती पाहून बाईनी शक्य तितक सौम्य सरळ उत्तर दिलं. कशा प्रकारचे म्हणजे? खरं प्रेम, अगदी अस्सल प्रेम! समजलं! आणि स्त्री–पुरुषात असे प्रेम असेल तरच लग्न शक्य आहे "

"हो ना! पण खरं प्रेम—बावनकशी प्रेम म्हणजे काय ते तर सांगा?" त्या उतारूंच्या डोळयातली चमक, विकट हास्य व प्रश्न विचारतानांची भेदरट वृत्ती स्पष्ट होत होती.

"प्रेम म्हणजे काय, हे प्रत्येकाला कळतं, तें मीच सांगायला पाहिजे कां?" बाईनी उत्तरें दिलें.

"अहो! पण मला कळत नाही" तो उतारू मध्येंच बोलला, जरा माझ्याकरता तुमचं म्हणणं स्पष्ट करा कीं—"

" काय, त्यांत काय आहे! अगदींच सोपी गोष्ट आहे." पण बाईमात्र जरा स्तब्ध व विचारात पडल्या आणि नंतर बोलल्या. " प्रेम म्हणज काय–काय? अहो प्रेम म्हणजे एकाच व्यक्तीची निवड. अगदीं एकाच बरं का! जगांतील इतरांना त्या बृत्तीशिवाय विसरणंच म्हणाना!"

" आवडणं! पण किती वेळ हो? त्याला काही काल–मर्यादा आहे की नाही? महिनाभर! दोन दिवस! अं! का अर्धा तास?" असा हंसत त्या उतारूने प्रश्न टाकला.

" अंऽहं! तुमच्या मनात कांहींतरी भलंतच चाललय! अगदीं स्पष्ट दिसतंय असं!"

" छे हो! दुसरं तिसर काही नाही. ज्या प्रेमाबद्दल तुम्ही बोलताय ना, त्या, त्या प्रेमाबद्दलच मी बोलतोय."

" बाईचं असं म्हणणं कीं,"–वकील साहेबानी मध्येंच तोंड घातलं. " स्त्री-पुरुषाना एकमेकाबद्दल वाटणाऱ्या ओढीची (आपली इच्छा असेल तर यालाच आपण 'प्रेम' म्हणू या') पुढची पायरी म्हणजे लग्न! अहो, अशी एकमेकाबद्दल भावना असेल तर, आणि तरच बर का लग्नाचं पावित्र्य! आणि अशा प्रकारें एकमेकाबद्दल वाटणारे किंवा नैसर्गिक असणारे आकर्षण एकमेकांपुरतंच बरं का. (तुम्हाला आवडत असेल तर या भावनेलाच आपण 'प्रेम' म्हणूं या.) ज्या लग्नात असेल त्यानींच स्वतःच्या एकनिष्ठेबद्दल व नीतीबद्दल गप्पा माराव्यात, इतर लग्नांत उच्च नीतीमत्तेची अपेक्षा फोल आहे. कां? माडलं ना तुमच म्हणणं बरोबर," बाईकडे वळत ते

वकील बोलले. बाईंनी मानेनेच वकिलाच्या म्हणण्यास होकार दिला.

" शिवाय, मला असं सांगावयाचं,—" पण वकिलांना त्या उतारूने पुढें बोलूच दिल नाहीं. त्याच्या डोळ्यातून जणूं निखारेच पडत होते. त्याला यापुढे स्वस्थ राहणं अशक्य दिसलं म्हणूनच तो बोलला.

" अहो! मीसुद्धा तुम्ही बोलताय त्याबद्दलच विचारतोय. तुम्ही म्हणता ती ओढ—तें आकर्षण—ती भावना—याला काही कालमर्यादा आहे का? किती वेळ टिकणार या गोष्टी?"

" किती वेळ? फार वेळ, समजलात—केव्हा केव्हा तर सबंध जन्मभरंसुद्धा!". बाईनी तोऱ्यानेंच उत्तर दिलं.

" होय हो! पण हें तुम्ही कादंबरी पुराण सुरू केलंत की! जगांत व्यवहारात, तर असं आढळत नाही बुवा! अपवाद म्हणून एकाद्याच्या आयुष्यात असं आकर्षण—अशी ओढ—प्रेम म्हणा पाहिजे तर, काही वर्षे टिकत असेल; पण हा मात्र अपवाद बरं का? बहुतेकात ही ओढ कांही महिने टिकते, तर काहींच्या वांट्याला थोडे आठवडे—काहीं दिवस—किंवा तास सुद्धा आलेले आहेत." या वाक्यानं आपण सर्वांना धक्का देत आहोंत याची त्यास जाणीव होती, व धक्का दिला याबद्दल त्याला समाधानही वाटत होतं!

" अऽय्या! किती विचित्र!" "छे! शक्यच नाही" " भलतंच काहीं तरी! माफ करा बुवा!" आम्ही तिघंही एकदमच उदगारलो. मुनिमानेंसुद्धा नापसंतीदर्शक आवाज काढला.

" होय हो! ठाऊक आहे मला!" जरा आवाज चढवूनच स्वारी बोलली. " बोलताहात हवेतल्या गोष्टी, मी सांगतोय जगात दिसणाऱ्या--व्यवहारात चाललेल्या अनुभवाच्या गोष्टी--समजलात! नाहीतरी तुम्ही म्हणता असलं आकर्षण--छे, चुकलो--' प्रेम,' प्रत्येक सुंदर तरुणीबद्दल प्रत्येक पुरुषास वाटतच की!"

" इश्श? काय भयंकर कल्पना करताहात आणि बोलताहात--अशी प्रेमाची भावना माणसात असते ही गोष्ट नाकबूल करण्यात काही अर्थ नाहीं. आणि हे प्रेम महिनाभर--वर्षभर--टिकणारं नसून जन्मभर टिकणारं असतं समजलात! खरं की नाहीं हो!" बाईंनी विचारलं.

' नाहीं! अगदीं त्रिवार नाहीं! एकाद्या माणसाला एकाद्या तरुणीबद्दल आकर्षण वाटलं--प्रेम वाटलं हें मला आजही कबूल आहे आणि ते जन्मभर टिकेल हेही मान्य आहे; पण त्याचबरोबर त्या तरुणीचं प्रेम मात्र तिसऱ्यावरच असेल हेही तितकच शक्य आहे. आतापर्यंत जगात अशाच गोष्टी चालत आल्या आहेत--चालू आहेत आणि जगाच्या अंतापर्यंत असंच चालणार." त्यान आपलं मत ठोकून दिलं आणि स्वतःच्या खिशातून सिगरेट काढून धूर काढण्यास सुरवात केली.

" एकमेकाच्या प्रेमावर हें अवलंबून आहे." वकिलांनी जरा आग्रहच धरला!

" नाहीं! ते शक्य नाहीं--अहो! किती दिवस तुम्ही आवळ्याची मोट बांधणार? उगीच अशक्य गोष्टींची मनोराज्यं

बांधून शेखमहंमदी राज्यांत वावरण्यांत काय अर्थ आहे? 'अति तिथं माती' ठरलेलीच आहे! जन्मभर एकाच व्यक्तीवर प्रेम ठेवूं म्हणणं आणि 'चतकोर भाकर आणि जन्मभर ढेकर' म्हणणं सारखंच आहे समजलात" वाक्य संपतांच त्यानें अधाशीपणानें सिगारेटचा झुरका मारला.

"हीनदर्जाच्या प्रेमाबद्दल तुम्ही हें बोलता आहांत!" बाईनी अडवण्याकरता प्रश्न टाकला, ' एकाच ध्येयाच्या दोन व्यक्तींत तत्त्वनिष्ठ प्रीती असूं शकेल त्याची तुम्हाला कल्पनाच करवत नाही का?"

" म्हणे ध्येयाची एकी!" चमत्कारिक पद्धतीनें त्यानें सुरवात केली, " पण असं असेल तर त्या दोन व्यक्तींत एक शय्यासुद्धा पाहिजेच हा आग्रह का? ( माफ करा हं! जरा असभ्य किंवा ग्राम्य वाक्य झालं म्हणे )' मताची जुळणी आणि शरीराची खेळणी" काय पण कल्पना आहे! तो चमत्कारिक रीतीनं हसला!

" पण, वस्तुस्थिति मात्र तुमच्या म्हणण्याच्या अगदी विरुद्ध आहे हं!" मध्येंच वकीलसाहेबानी सुरवात केली, ' अहो, डोळ्यानी आम्ही दररोज हजारोंनीं लग्न लागलेली पाहतो आहोंत. त्यांना मुलंबाळं होत आहेत. वाढता वेल वाढतो आहे. फळंफुलं येताहेत. अजून माणसं संसारसुख भोगताहेत—मग!"

पिकलेल्या केसाचा उतारू पुन्हा एकदा हसला. " तुमचा हट्ट कीं लग्नाचा पाया म्हणजेच प्रेम! मग जरा शंका घेतली कीं, शारीरिक गरजेशिवाय दुसरं त्यांत प्रेम वगैरे कांहीं नाहीं?

बाधून शेखमहंमदी राज्यात वावरण्यात काय अर्थ आहे? 'अति तिथं माती' ठरलेलीच आहे! जन्मभर एकाच व्यक्तीवर प्रेम ठेवूं म्हणणं आणि 'चतकोर भाकर आणि जन्मभर ढेकर' म्हणणं सारखंच आहे समजलात" वाक्य संपताच त्यानें अधाशीपणानें सिगारेटचा झुरका मारला.

"हीनदर्जाच्या प्रेमाबद्दल तुम्ही हें बोलता आहात!" बाईंनी आडवण्याकरता प्रश्न टाकला, ' एकाच ध्येयाच्या दोन व्यक्तींत तत्त्वनिष्ठ प्रीती असूं शकेल त्याची तुम्हाला कल्पनाच करवत नाहीं का?"

" म्हणे ध्येयाची एकी!" चमत्कारिक पद्धतीने त्यानें सुरवात केली , " पण असं असेल तर त्या दोन व्यक्तींत एक शय्यासुद्धा पाहिजेच हा आग्रह का? ( माफ करा हं! जरा असभ्य किंवा ग्राम्य वाक्य झालं म्हणे )' मताची जुळणी आणि शरीराची खेळणी" काय पण कल्पना आहे! तो चमत्कारिक रीतीनं हसला!

" पण, वस्तुस्थिति मात्र तुमच्या म्हणण्याच्या अगदीं विरुद्ध आहे हं!" मध्येच वकीलसाहेबांनीं सुरवात केली, ' अहो, डोळ्यांनीं आम्ही दररोज हजारोंनीं लग्न लागलेली पाहतो आहोत. त्याना मुलंबाळं होत आहेत. वाढता वेल वाढतो आहे. फळंफुलं येताहेत. अजून माणसं संसारसुख भोगताहेत—मग?"

पिकलेल्या केसाचा उतारू पुन्हा एकदा हसला. " तुमचा हट्ट की लग्नाचा पाया म्हणजेच प्रेम! मग जरा शंका घेतली कीं, शारीरिक गरजेशिवाय दुसरं त्यात प्रेम वगैरे काही नाही?

तर, आता तुम्हीच सांगता आहात की, लग्न होऊन जगात लोकसंख्या वाढत आहे म्हणून प्रेम आहे हे ठरतेच! अहो! हल्लींची लग्नं म्हणजे शुद्ध फसवणूक आहे. आधळ्या कोशिंबिरीचा खेळच म्हणाना!"

"माफ करा हं!" वकिलानी वकीली केली, "माझं म्हणणं इतकंच की, लग्नं पूर्वी होत होती, अजुनीही होताहेत-लग्न-संस्था टिकून आहे."

"म्हण लग्न होत होती–होताहेत-लग्न संस्था टिकून आहे.! अहो, पण ती का टिकून आहे? ज्याना परमेश्वरानं बांधलेल्या जन्म गाठीत–मंत्रोच्चाराच्या [illegible] संस्कारात काहीतरी गूढ व पावित्र्य वाटत आहे–त्याच्यात ती टिकून आहे, समजलात? तुमच्या आमच्यात नाहीत बरं का? पण ज्याना तुमच्या आमच्यासारखं त्यात काहीच पवित्र वाटत नाही, त्यानी सततीकरता केलेली लग्न म्हणजे शुद्ध फसवेगिरी अगर अत्याचार आहे. आणि ही फसवेगिरीसुद्धा का? तर जगाच्या डोळयात धूळ फेकण्याकरतांच बिचारी नवरा–बायको एका ठिकाणी राहातात, ही जगाची समजूत, पण त्याचं आयुष्य म्हणजे... याची स्वाणच! हेंही चाललच आहे.–आपण सहन करतोच आहो, पण लग्नाच्या घटकेपासूनच ज्या नवराबायकोंत वितुष्ट आले आहे, एकमेकाची तोंडसुद्धा पाहण्याची ज्याची इच्छा नाही, पण व्यवहार म्हणून मात्र-एके ठिकाणी राहिलेच पाहिजे–त्याचे हाल काय विचारता! बिचाऱ्यांचं आयुष्य म्हणजे शुद्ध नरकवास!

मग दारू पितील–वेड लागेल–एकमेकाना विषप्रयोग करतील–ठारसुद्धा मारतील!" दुसऱ्याला बिलकूल संधि न देता सारखा तो बोलत होता व तसतसा त्याचा राग आणि आवाज वाढतच गेला.

आम्ही सर्वच गप्प बसून राहिलो. आम्हाला कससंच वाटायला लागल

"हं! माणसाला संसारात दुर्धर प्रसंग यायचेच!" कंटाळवाण्या शांततेचा भंग करून निष्कारण वाढलेल्या विषयाला पूर्णविराम मिळावा म्हणून वकील म्हणाले,–

"म्हणजे! मी कोण हे आपण जाणता तर," पिकलेल्या केसाच्या उताराने जरा शान्तपणाने विचारले.

"छे इतकं कुठलं आलेय माझं भाग्य!

"असे निराश होऊं नका! आपला भाग्योदय जास्त दूर नाही माझं नाव भाऊसाहेब सुमंत बरं का! संसारात दुर्दैवी घटना घडून प्रत्यक्ष बायकोचा मी खून केला, समजलं" त्यानं जलद आळीपाळीने सर्वांकडे पाहिलें. आम्ही कांहीच न सुचल्यामुळे मुग्धस्तंभासारखे गप बसून राहिलो. "असो, झालं ते झालं माफ करा हं! आता आपल्याला आणखी त्रास देत नाही."

"छे हो! त्रास कसचा त्यात. तसलं कांही मनातसुद्धा आणू नका हं!" वकीलसाहेब बोलत होते, पण ते काय बोलत होते हे त्याच त्यांना तरी कळत होत की नाही शंकाच आहे! भाऊसाहेबांनी तिकडे लक्षच दिलं नाही व तो बिचारा आपल्या जागेवर जाऊन बसला. वकीलसाहेबांच्या आणि त्या बाईच्या कानगोष्टी सुरुं झाल्या.

— ३ —

भाऊसाहेब सुमंताच्या समोरच मी बसलों होतो, पण यावेळी त्याचेशी काय बोलावं हे मात्र सुचेना. अंधार तर पडत चाललाच होता. मी डोळे मिटले आणि निद्रादेवीची प्रार्थना सुरुं केली. पुढच स्टेशन येईपर्यंत असाच वेळ गेला, आणि मग मात्र तो वकील आणि ती बाई दुसऱ्या डब्यात बसण्याकरता निघून गेली. दोघानीही तसा बेतच केलेला दिसला. मुनीमानं जरा हातपाय मोकळे सोडून डुलक्या घेण्यास सुरवात केली भाऊसाहेब सुमत मात्र सारख्या सिगारेट ओढत होते व स्वतः तयार करुन थर्मासमध्ये भरुन ठेवलेला चहा ढोसत होते. मी जरा डोळे किलकिले करुन पाहतोय तोंच त्यानी जरा निश्चयाने पण चिडक्या आवाजात विचारले, आता मी कोण आहे. हे कळलं ? "आता माझ्या शेजारी बसणं जरा कमीपणाचं आणि त्रासदायक वाटत असेल नाही? तसं वाटत असेल तर मीच दुसऱ्या डब्यात जातो!"

"छेः हो! तसं बिलकूल नाही, अगदी मनातसुद्धा आणूं नका तस काही.!"

"ठीक! मग थोडा चहा देऊ का तुम्हाला? बाकी चहा जरा स्ट्रॉगच आहे बर का!" असं म्हणत त्यानं चहा ओतलासुद्धा "हे लोक बोलतात,—पण जें बोलतात ते मात्र सारं खोटं... ..."

"म्हणजे कशाबद्दल बोलताहात तुम्ही?" मी चौकशी केली.

"अर्थात् विषय मद्याचाच, त्यांचे ते 'प्रेम' आणि प्रेमाचे प्रकार झोप येत नाही वाटतं तुम्हाला ?"

"अगदी बिलकूल नाही. डोळ्याला डोळा कसा तो लागत नाही बघा."

"मग, आपली इच्छा असेल तर 'प्रेमामुळच माझ्या हातून तो भयंकर प्रकार कसा घडला' ते सांगं का ?"

"अगदी अवश्य ! पण त्यामुळें तुम्हाला काही त्रास होत नसेल, तरच बर का ?"

"छे: हो ! उलट तोंड बंद ठेवून त्रास होतो. आणखी चहा घेता ? तुम्हाला जरा स्ट्रॉंग वाटत असेल नाही ?"

खरोखरीच चहा जरा स्ट्रॉंगच होता. चहा कसला काढाच म्हणाना ! तरीपण सबंध एक कप मी घेतला. याच वेळीं तिकीट-कलेक्टर डब्यातून दुसऱ्या डब्यात गेला. भाऊसाहेब सुमंतांनी त्याचेकडे जरा तिरस्काराने पाहिलं आणि तो गेल्यावर बोलायला सुरवात केली.

"बरं ! मग, मी माझी हकीगत सागतो; पण खरोखरीच तुमची ऐकण्याची इच्छा आहे ना ?"

त्याची हकीकत ऐकण्याची माझी उत्कंठा मी त्याना पटवून दिली. एक क्षणभरच ते स्तब्ध बसले, आणि त्यानीं सुरवात केली---

"माझं लग्न होण्यापूर्वी आपल्या समाजातील इतर लोकाप्रमाणेंच मी वागत होतो. मी जमिनदार आहे—महाविद्यालयाचा पदवीधर आहे—आणि सरकार ही पदवीही एके काळीं धारण

केली आहे. लग्नापूर्वी सर्वांप्रमाणेच म्हणजे नीतीने नव्हे–मी राहात होतो. आणि माझ्या दर्जाच्या इतर मंडळींप्रमाणेच मला माझे आयुष्यक्रमात कर्तव्य-पालन होत आहे असं वाटत होतं. माझं एकंदर वागणं मला नमुनेदार वाटत होतं आणि मी स्वतःला पूर्ण नीतिमान् समजत होतो -कोणत्याही कुलीन स्त्रीकडे मी पापी नजरेनं पाहिले नाही. शिवाय बीभत्स गोष्टीचा मला जरा तिटकारा, त्यामुळे माझ्याच दर्जाच्या व वयाच्या पुष्कळ मंडळींप्रमाणे सुख हेंच माझे ध्येय नव्हतें. तसं वेडंवाकडं पाऊल पडलं असेल, पण ते निव्वळ शारीरस्वास्थ्यापुरतंच बर का! आपलं प्रेम दाखवून जाळ्यात पकडणाऱ्या बायांना मी टाळीतच असे या खेरीज म्हणाल, तर मलाही आकर्षण वाटलीं नाहीत असं नाही; पण तीं मी वाढूं दिलीं नाहीत आणि यालाच मी नीतिमान् वागणूक समजत होतो. इतकेंच नव्हे, तर याबद्दल मला अभिमान वाटत होता."

इथे तो जरा थाबला, आणि त्यानें एक विवक्षित आवाज नाकातून काढला. मला वाटतं त्याला नवीन विचार सुचला की अशा आवाज करण्याची त्याला संवयच होती.

"हाच माझ्या स्वभावात दोष होता," त्याने सुरवात केली. "स्त्रीपुरुष संबंधात शारीरिक संबंधालाच महत्व आहे असं नाही–संबंधातच पाप आहे असं नाही–तर ज्या वेळी दोन तरुण जीव असे बांधले जातात, त्यावेळी निव्वळ शारीरिक पापच त्याना त्रास देत असेल असं आपण समजतों. पण खरं म्हणजे सहवासाची परतफेड फक्त प्रेमानेंच होऊं शकते. पण अशा परतफेडीच्या कर्तव्यात मी गुंतून राहात नव्हतो

आणि यालाच मी गुण समजत होतो आणि एके ठिकाणी पैसे न देता परत आल्यामुळे मला किती त्रास झाला हेही मला आता आठवत आहे. त्या बिचारीचं कदाचित् माझ्यावर प्रेमही बसल असेल. आणि तिला पैसे दिल्या शिवाय मला नेहमीची मनःशान्तीही मिळाली नाही आणि पैसे देऊन सर्व प्रकारच्या कर्तव्यबंधनातून मी सर्वस्वी सुटलो हेहि पण मी तिला पटवल!"

"माझं म्हणण पटत आहे असं तुम्ही उगीच दाखवू नका!" मध्येच त्याने आवाज चढवला. "अशा पुष्कळ युवत्या मी पाहिल्या आहेत. व जसा वागलो तेच बरोबर असं पुष्कळाचे मत आहे. आणि तसच तुमचंही असणार, अर्थात् तुम्ही अगदी अपवाद नसाल तर? सगळीकडे सारखंच आहे माफ करा ह -पण खरं म्हणजे हे फार भयंकर आहे."

"काय भयकर आहे?" मी विचारले.

("आपली बायकाची वागणूक आणि त्याच्याबद्दल खोट्या आशेंत निर्माण झालेले गैरसमजाचं जजाळ.) मी शातपणानें वागू शकत नाहीं. असं नाही तर मधाशी 'दुर्धर प्रसग' म्हणून त्यानीं उल्लेख केला व तसा प्रसंग माझेवर आला म्हणून त्या दिवशी माझे डोळे खाडकन उघडले. आता प्रत्येक गोष्टीचं निराळंच चित्र मला दिसत आहे. अगदी अंतरंग उघडी दिसतात उघडी नागडी दिसतात."

त्यानं सिगारेट पेटविली. आणि गुडघ्यावर कोपर ठेऊन बोलण्यास सुरुवात केली. अंधारांत त्याचा चेहरा मला दिसत

नव्हता. आगगाडीच्या खडखडातून त्याचा अधिकारयुक्त व वेचक आवाज मात्र ऐकूं येत होता.



" या संकटाचं मूळ कशात हे सुद्धां मी पुष्कळ शारीरिक –मानसिक यातना भोगल्यावर माझ्या लक्षात आले. यातना बद्दल कांहीच वाटत नाहीं. कारण त्यामुळेच माझे डोळे उघडले. कसं असायला पाहिजे आणि वस्तुस्थिति काय भयंकर आहे याची मला पूर्ण कल्पना आली.

" आता त्या दुर्धर प्रसंगा" च्र मूळ कुठं आहे आणि सुरुवात केव्हा आणि कशी काय झाली हेच मी सांगतो. अधःपाताच्या खोल गर्तेत माझं पहिलं पाऊल पडलं त्या वेळी माझं वय पूर्ण सोळा वर्षांचं सुद्धा नसेल. त्यावेळी मी विद्यार्थी होतो आणि मोठा भाऊ कॉलेजात होता. माझी यापूर्वी कोणत्याही स्त्रीशी ओळख नव्हती पण आमच्या समाजातील इतर दुर्दैवी मुलाप्रमाणें मी निष्पाप अगर निर्दोष होतो असं मात्र नव्हे. दोन वर्षांपूर्वीच माझ्या सोबत्यांनी माझं अन्तःकरण बिघडवून टाकलं होतं. नुसता स्त्रीचा विचार विवक्षित नव्हे– कोणत्याही स्त्रीचा विचार माझ्या अन्तःकरणात खळबळ उडविण्यास पुरेसा होता.

" मी एकटा असताना माझे विचार पवित्र नसत. इतर नव्याण्णव टक्के मुलाप्रमाणेंच मला त्रास होत असे. मला भीति वाटत असे–दुःख होई. मी परमेश्वराची प्रार्थना करी–शेवटी अधःपात हा झालाच !माझा मानसिक अधःपात झालाच होता.

माझ्या एकट्याचा नाश होत होता पण, दुसऱ्या कोणत्याही व्यक्तीला मात्र या अधःपातात मी अजुनी गोवलं नव्हतं.

" याच सुमारास एके दिवशी माझ्या भावाच्या एका मित्रानें—तोहि एक विद्यार्थीच होता—आनंदी तरुण होता! समाजात आपण ज्याला सज्जन म्हणतो ( नालायक समाज-कंटक ) त्यानंच आम्हाला दारू प्यायला आणि जुगार खेळा-यला शिकवलं. यानच एका रात्री दारूच्या निशेत तिथं जाण्याचा आग्रह धरला. तोपर्यंत माझा भाऊ निष्पाप होता आणि त्याच रात्री त्याचा अधःपात झाला. आणि मी—नुकताच मिसरूड फुटलेला, सोळा वर्षांचा पोर—माझंही पाउल त्याच दिवशी वाकड पडलं! काय केलं हेसुद्धा मला कळल नाही!

" मी करतोय हे चूक आहे असं कोणीही वडीलधाऱ्या माणसानी मला सांगितलं नाही—आणि आश्चर्य म्हणजे हल्लीच्या तरुणपिढीला ही चूक आहे असं अजुनी कोणी सांगत नाही आता, याबद्दलची संतवचनं शाळेतील अगर कॉलेजातील मुलांच्या पुस्तकात दिसतील आणि ती ते तोंडपा-ठही करत असतील; पण याची गरज आहे असं थोडच आहे! निदान ' इ.क्ष पच मुचि ऋच्च् वचाविच ' पाठ केल्याशिवाय संस्कृतात पास होणार नाही असं याचं थोडंच आहे! निदान ज्याच्या बोलण्याला—मताला मी मान देत होतो, अशा कोणाही वडीलधाऱ्या माणसानी मी चूक करतोय हे सांगितलं नाही, उलट मला आदर असणाऱ्या लोकानी मी करतोय तेच बरोबर, हेच सुनावलं! उलट मला असं सांगण्यात आलं की, यापुढें मला शारीरिक सुख आणि मनःशांती मिळेल, हे मी ऐकलंही

होतं आणि वाचलेंही होतं. मला माझ्या वडील मंडळींनी मी चूक करताय हे कधीच सांगितलं नाही. ज्या मंडळींची मला माहिती होती, त्यांना स्वतःची वागणूक पुरुषार्थाची वाटे. एकंदरीत काय, झाला तर चांगलाच परिणाम होईल, हे मला स्पष्ट दिसत होतं! काही भलत्यासलत्या रोगाची, परिणामाची वगैरे भीति कशी वाटली नाही म्हणता ? अहो! आमच्या दूरदर्शी मायबाप सरकारनं त्याची व्यवस्था आधीच करून ठेवली आहे ना! लठ्ठ पगाराचे डॉक्टर नेमलेत ना या गोष्टीकरता! अगदी जसं पाहिजे तसं चाललंय बघा सगळं! शरीर–प्रकृतीला काय हितकर आहे हे डॉक्टरनी ठरवायचं आणि त्यांनीच वागणूकीची पद्धत आखून टाकायची! याबाबत डॉक्टरच्या सल्ल्याबरहुकूम चालणाऱ्या पुष्कळ लेकुरवाळ्या स्त्रिया माझ्या प्रत्यक्ष ओळखीच्या आहेत याला शास्त्रीय शोध जबाबदार आहे समजलात ?"

"शास्त्रांनी काय घोडं मारलंय ?" मी विचारलं,

"डॉक्टर म्हणजे तरी काय ?" त्याने उत्तर दिलं. शास्त्रीय विषयापुरते धर्ममार्तंडच की नाही ? आरोग्याला आवश्यक गोष्टींची चर्चा करून तरुणाची नीतिमत्ता कोण बिघडवतो ? आणि नंतर, स्वयंमन्यतेचा आव आणून परिणाम निस्तरायचा कोण प्रयत्न करतो ?"

"पण त्यांनी तक्रारी अगर दुखणी बरी का करूं नयेत!" मी विचारले

"कारण, रोग निवारणाकरता जे प्रयत्न चाललेत त्याच्या एक शतांश प्रयत्न रोगाचं मूळ शोधून काढून ते नाहीसं

करण्याचा प्रयत्न केला, तर आतांपर्यंत तक्रारच शिल्लक राहिली नसती. पण छे! संकट टाळण्याकरतां हे प्रयत्न नसून स्वैराचाराचा दुष्परिणाम होणार नाही अशी हमी देण्याकरता— स्वैराचाराला उत्तेजन देण्याकरता हें सर्व चाललं आहे! पण, माझा मुख्य मुद्दा हा नाहीं. माझी मुख्य तक्रार परिस्थितीविरुद्ध आहे. ज्या परिस्थितीत माझा अधःपात झाला, त्याच परिस्थितीनं आपल्या समाजातील समान दर्जाच्या शेकडा नव्याण्णव लोकाचे बळी घेतले आहेत आणि याचीच झळ इतर समाजास शेतकऱ्यासमुद्धा लागलेली आहे. माझा अधःपात झाला, पण त्यात नैसर्गिक 'प्रेम' होतं अशी सबबसुद्धा सांगता येणार नाहीं. छे! प्रेमामुळे माझा अधःपात झाला नाही, तर ज्या लोकात मी रहात होतों, त्यातील काहींना ही बाब अगदी कायदेशीर आणि वाजवी अशी वाटली. तर काहींना नैसर्गिक व त्यामुळे लक्ष देण्यासारखीसुद्धा वाटली नाहीं. त्यांच्यामतें तरुण माणसास अशी निष्पाप करमणूक पाहिजेच! मला स्वतःला माझा अधःपात झाला आहे अशी शंकासुद्धा आली नाही; नि मला स्वतःला ती थोडी सुखाची व काही अंशी गरजेची बाब वाटूं लागली. कारण, लोकानी माझी तशी समज करून दिली. नाहीतरी मी दारू पित होतो—सिगरेट ओढत होतोंच की! तरीपण, या प्रथमच्याच अधःपाताच्या वेळीं माझ्या मनाला थोडा चमत्कारिक केवीलवाणेंपणा आला हें खरंच! अधःपाताच्या क्षणाबरोबरच दुःखाची दाट छटा माझ्यावर पसरली आणि कोठेंतरी बसून खूप रडावं असं वाटूं

लागलं! कधीही भरून न येणारी माझी ब्रम्हचर्याची हानी, स्वतःचं दुष्कृत्य याबद्दल खरोखरी मी रडलो असतो!

"यापुढें स्त्रियांकडे पहातांना मुलासारखी निष्पाप आणि पवित्र अशी मोहक व नैसर्गिक माझी नजर कशी राहणार, सिगारेट ओढून घशाचं धुरकांडं केलेला—दारू पिऊन पिऊन घशाचं गटार बनविलेला—अगर अफूच्या गोळया चढवून डोळयाच्या खाचा झालेला माणूस यांच्यांत नेहमींची माणुसकी कोठून राहणार! या लोकात आणि माझ्यासारख्या अधःपात झालेल्या माणसांत फरक नाही. आम्ही म्हणजे डागळलेली, कुजण्याच्या मार्गास लागलेली माणसं! दारूबाज अगर अफिणी तुम्ही चेहऱ्यावरून, चालण्यावरून, वागण्याच्या पद्धतीवरून ओळखूं शकतो, तेच माझ्यासारख्या माणसाच्या बाबतींतही खरं आहे! स्वतःवर ताबा ठेवण्यात त्याला यश मिळेल स्वतःच्या दुष्कृत्याची जाहिरात करणाऱ्या हालचाली अगर चेहऱ्यावरील विकार तो छपवूं शकेल; थोडक्यात म्हणजे त्याच्या अन्तःकरणांत स्वतःपुरतं त्याच्या नेहमीच्या लहरीविषयी खळ-बळही उडेल, पण त्याला उभ्या जन्मांत कोणत्याही स्त्रिशीं नैसर्गिक, निर्मल व सात्त्विक असं भगिनी प्रेमाचं नातं जोडत येणार नाहीं व तो सात्त्विक आनंद उपभोगतां येणार नाहीं!

"आणि असा मी एक सुखलोलूप आणि विषयलंपट मनुष्य बनलों आणि तसाच राहिलों. यांतच माझ्या नाशाचं बीज पेरलं गेलं!"

— ५ —

"यानंतर मात्र मी कर्दमात जास्त जास्तच [redacted] जाऊं लागलों. आणि अजूनी माझ्या मनांत येतें कीं, "मी काय केलं"—उलट माझ्या इतर सोबत्याच्या मानानं मी पवित्रच होतो. उलट माझी 'सोज्वळ' वागणुक ही त्यांच्या नेहमीच्याच चेष्टेची बाब होती. ही झाली आमची हकीगत; पण जर तुम्हाला मी पुण्यामुंबईच्या सुधारक फॅशनेबल तरुणाची गोष्ट बोललों तर तुमचा आच वासेल! आणि हीच तरुण माणसं मी-सुद्धा त्यापैकीच. ऐन उमेदीतील अविनाशी धाडसी वीर-हरएक तऱ्हेच्या दुःष्कृत्यानी बुजबुजलेलं अन्तःकरणं घेऊन मोठ-मोठ्या सामाजिक समारंभात भाग घेताहेत. यावेळी परीट-घडीचे कपडे, गुळगुळीत दाढी, अत्तराचा वास, दोषरहीत आधुनिक पद्धतीचे कपडे घालून तुमच्यांत मिसळत आहेत, आणि हे "पवित्र्याचे पुतळे!" मौज आहे नाही?

"जरा विचार करा, काय असायला पाहिजे आणि काय चाललंय! आताच सांगितलेल्या वर्णनाच्या एकाद्या तरुणाचा माझ्या मुलीशीं अगर बहिणीशी गांठ पडण्याचा प्रसंग आला आणि जर मला त्याच्या आयुष्याची माहिती असेल तर मी त्याला बाजूला नेऊन सांगितलं पाहिजे कीं, बाबारे! तुझ्या आयुष्याची गुंतागुंत मी जाणतों. तुझ्या रात्रीं कुठं आणि कशा जातात हें मला माहित आहे; ही जागा तुला योग्य नाही; कारण इथं निर्दोष व निष्पाप मुली आहेत. बाहेर, बाहेर पळ

कसा बघू!' असं खरोखरी वडायला पाहिजे! पण, असा मनुष्य सरळ आपल्या मुलीबाळीत मिसळतोय आणि त्याच्या श्रीमंतीकडे आणि त्याच्या समाजातील वजनदार स्नेह्याकडे पाहून आपण त्यात उलट आनंदच मानतो आहोंत! या तिरस्कारणीय गोष्टी, ही उद्वेगजनक असत्यं. यांचा कायमचा निकाल लावून याचं खरं नागडं-उघडं स्वरूप दिसण्याकरता किती दिवस जाणार आहेत हेंच कळत नाही! दुर्दैवाची तर कमाल आहे!"

त्यानें पुन्हां त्याचा तो विविक्षित आवाज नाकांतून काढला आणि पुन्हा चहा ढोसण्यास सुरवात केली. खरोखरी चहा फारच स्ट्रॉंग होता व जरा फिका करावा म्हटलं तर हाताशीं दूधही नव्हतं. मी दोनच कप चहा घेतला, पण मला बरीच तरतरी वाटत होती. स्ट्रॉंग चहाचा त्याचेवर पण परिणाम दिसत होता. तो जसा जसा जास्त चहा पित असे, तसा तसा जास्त उत्तेजित दिसत असे त्याच्या आवाजाचा नाद व परिणामकता वाढतच गेली. तो सारखी आपल्या जागेवर चुळबुळ करी-डोक्याला टोपी घाली—काढी. रात्रीच्या अंधारात त्याचा चेहरा भलताच बदलला आहे असं वाटूं लागलं!

"यःप्रमाणें मी आयुष्याची तीस वर्षे काढली, पण मनात एक विचार की, आपण लग्न करावं. कोठेंतरी स्थयिक होऊन राहावं-सोज्वल व नमुनेदार कौटुंबिक आयुष्य घालवावं. हा हेतु मनात धरून मला साजेशी मुलगी मी काळजीपूर्वक शोधित होतो. पवित्र आणि सोज्वळ वर्तनानं माझी बायको होऊं शकेल

अशा मुलीकरता मी बारीक नजरेने विचार केला. मी जितक्य मुली पाहिल्या—तितक्या नाकारल्या, कारण माझ्या अपेक्षेच्या मानानं त्यांचे पावित्र्य-कौमार्य कसाला उतरणार नव्हते. आणि शेवटी मला योग्य अशी एक वधू मी शोधून काढली.

"स्मृतिपूर" नगरच्या एका काळच्या श्रीमंत इनामदाराच्या दोन मुलींपैकींच ही एक! पण ह्यावेळीं त्यांची गृहस्थिती जरा हलाकीची आणि कष्टाची झाली होती. एक दिवस संध्याकाळी मी आणि ही नौकाविहाराला गेलों असताना, परत यायली रात्र झाली. नौकेंत मी तिच्या अगदी शेजारी बसलो होतो. चंद्राच्या कोमल किरणानी सारं वातावरण धुऊन काढले होते! तिचं ते बांधेसूद शरीर, कुरळे केस, लांब शेपटा आणि अंगाबरोबर तंग बसलेली जर्सी यांची मी मनात तारीफ करीत होतो! मी एकदम निश्चय केला कीं, मला योग्य ती मुलगी हीच! रात्रीं पडल्या पडल्या माझ्या डोक्यांत आल कीं, ह्या मुलीबद्दल जे विचार व ज्या भावना मला वाटताहेत, त्या ह्या मुलीनें आधीच ओळखल्या असाव्यात! ह्या! माझ्या भावनेंत आणि विचारात उच्च आणि पवित्र वातावरण होतं, आणि खरोखरी माझ्या मनात हे विचार येण्याच कारण म्हणजे तिचे कुरळे केस, लांब शेपटा व तंग कपडे जे तिला फारच शोभून दिसत असत, आणि ह्यामुळेंच तिच्या निकट-सहवासाबद्दल उत्कंठा वाढली!

सौंदर्यात सगळेंच सद्गुण साठवलेले असतात, हा आपला केवढा विचित्र भ्रम आहे. गाढवासारखे तोंडाला येईल ते

एकाद्या मोहक तरुणीने बरळत सुटायचं—तोंडाचा आ करून माशाशीरेपर्यंत हे आपण ऐकायचं—आणि ह्या बरळण्यालाच आपण बुद्धीमत्ता समजायची! हेच जर थोडया संयमानें तिनें मूर्खपणाचं वागणं आणि किळसवाणं बोलणं सोडलं- आणि जर ती सौदर्यवान असेल तर आपण तिला बुद्धीमत्ता आणि नीतिमत्ता याची देवताच मानतो! तिच्या नीतिमत्तेच्या पूर्णतेची मला खात्री वाटू लागली व हीच बायको मला योग्य, या विचारानें माझे मन भारून गेलं. दुसऱ्याच दिवशी मी तिला मागणी घातली.

"विचाराच्या गुंतागुर्ताचा किती गद्धेगोधळ हा! (गाढवाचा गोंधळ—लाथाचा सुकाळ)—हजार उदाहरणं जरी तुम्ही डोळयासमोर आणलीं—आणि हे आपल्यातच चाललंय असं नाही—दुर्दैवानं खालच्या वर्गातही हेंच संकट आहे—तर अग्निनारायणाच्या व समाजाच्या साक्षीन लागलेल्या लग्नाशिवाय गांधर्वपद्धतनि असंख्य विविध उपभोग न घेतलेला एकादाच अपवाद आढळेल! (माझ्या कानावर असं आलंय--आणि मी स्वतःच्या अनुभवावरूनही हे सांगू शकतों की, पावित्र्य आणि ब्रह्मचर्य हीं चेष्टेची गोष्ट नसून निष्ठेची व महत्त्वाची बाब आहे. हे हल्लीचे बरेच तरुण जाणतात व हे त्यांना पटलेहि आहे. परमेश्वराची पांखर असो बिचाऱ्यावर! पण माझ्या वेळी लाखात एक उदाहरण नव्हतं असं!) प्रत्येकाला हें आहे व अशी नैसर्गिक वस्तुस्थिति आहे याची पूर्ण जाणीव आहे; पण याच्या उलट परिस्थिति आहे अशी उगीच बतावणी करायची आणि तोच समज कायम ठेवायचा!

" नायकाच्या भावनाचं सूक्ष्म वर्णन केलल तुम्हाला प्रत्येक कादंबरीत आढळेल. ज्या ज्या ठिकाणी नायक--नायिका हिंडल्या--फिरल्या त्या त्या ठिकाणच्या रमणीय सरोवराचं--रस्त्याचं--इतकच काय, पण तेथील झाडाझुडुपाच सुद्धा बिनचूक वर्णन आढळेल, पण नायकाचं नायिकेवर प्रेम बसलं असं एकदा पटवल की. या वरिच्या मागच्या प्रेमलीला मात्र सबंध कादबरीत कोठेच आढळणार नाहीत. अशी वस्तुस्थितिनिदर्शक एकादी कादबरी असलीच,--तर ज्याना या गोष्टीचं खरोखरीच ज्ञान पाहिजे, अशा तरुण मुलींच्या हातीं हे पुस्तक दिलं जात नाही. शहरातल्या असो अगर खेड्यातल्या असो, माणसाचं आयुष्य दुष्कृत्यात जाते. ती दुष्कृत्य खरोखरीच अस्तित्वातच नाहीत अशी त्या मुलीची खोटीच समजूत करून दिली जाते. सरावानं हा दांभिकपणाच अंगवळणी पडतो, आणि मनापासून अस वाटू लागतं की, असं असूनसुद्धा आपण नीतिमानच आहोत व या वागणुकीनची जग नीतिमान आहे! गरीब बिचाऱ्या पोरीचाही याच्यावर अगदीं मनापासून विश्वास बसतो. माझ्या दुदैवी वाग्दत्तवधूची हीच समजूत होती! दुसऱ्या कोणाकडून कळण्यापेक्षा आपणच आधी जाणीव दिलेली बरी, या दृष्टीने एक दिवस मी तिला माझी डायरी दाखवली. हेतु हा की, माझ्या पूर्वायुष्याची ओझरती तरी कल्पना लग्नापूर्वी तिला असावी! त्याच पानावर मी माझी अनैतिक प्रेमकहाणी लिहिली होती. हे वाचताक्षणीच तिला केवढा धक्का बसला--तिची किती निराशा झाली--हे दृश्य

माझ्या आतासुद्धा डोळ्यासमोर आहे. अशा माणसाशी संबंध तिथल्या तिथं तोडावेत असं तिला वाटलं, हें माझ्या ध्यानात आलं!

" आणि तसं करण्यास तिला आडकाठी कसली होती? "—मी विचारलं.

त्यानं त्याचा तो विशिष्ट आवाज काढला—अगदी स्तब्ध बसला नि पुन्हा एकदा चहाचा काढा ढोसला.

" असो, झालं ते बरं झालं. हो! तेच बरं झालं! "—तो उद्गारला. " माझ्याबाबतीत झालं तेच बरोबर झालं! "

— ६ —

" पण मुद्दा हा नाही. मला हे सांगायचंय की, या सर्वात जर खरोखरी कुणाची फसवणूक होत असेल, तर ती मुलींची होते. परिस्थितीचं खरं ज्ञान नवऱ्याकडून बायकोला होतं—पुरुषाच्या एकनिष्ठेवर विश्वास असल्याचं खोटं ढोंग ती करत असतानाच स्वतःच्या भावनेच्या व वस्तुस्थितीत नसलेल्या आधारावर वागतात. त्या स्वतःकरता व मुलीकरता पुरुष पकडताना कोणतं आमिष दाखवावं—कोणता गळ वापरावा—याची स्त्रियांना पूर्ण कल्पना असते!

" आम्हा पुरुषांना फक्त याची माहिती नसते आणि हे कळून घेण्याची इच्छा नसल्यामुळेच फक्त आपण अज्ञानात असतो ' स्वर्गीय प्रेम ' अगर ' कवी कल्पनेतलं प्रेम ' हे नैतिक गुणावर अवलंबून नसून,- मोहक कपडे, चेहऱ्याची रंगरंगोटी, केसांची ठेवण, व चोरट्या गाठीभेटी यावर अवलंबून

आहे हे स्त्रियाना पूर्ण माहीत असतं. कसबेगिरी, जुलूम, अगर ज्याच्यावर झडप घालायची आहे त्याच्या समोर व्यभिचार आणि हीन रंगोटीचा चेहरा व विद्रूप कपडे या दोन संकटापैकी कोणतं पत्करता—असं एकाद्या अनुभविक नम्बेरल—स्वतःच्या जाळ्यात पकडण्याकरता टप-लेल्या फटाकडीला विचारा, अगदी पूर्ण विचारान ती पहिलं पसंत करील. पुरुषानी ... ... ... कितीही मोठ्या गप्पा मारल्या तरी त्याना खरोखरी स्त्रियाची गरज आहे, आणि त्यामुळे ते स्त्रियाच्या कोणऱ्याही दुर्वर्तनाकडे कानाडोळा करतील, पण त्याना कसलेतरी वेंधळे कपडे कधीच खपणार नाहीत. "प्रत्येक लुच्चोर बाईस याची अनुभवाने जाणीव असते, तर निष्पाप कुमारिकाना अजाणतेन (नकळत) जाणीव असते, आणि यामुळेच बिनबाह्याचे व उघड्या कालरचे ब्लाऊझ, बिन कासोट्याची पातळ, आपल्या दृष्टीस पडतात. हेतु इतकाच की, स्वतःच्या उन्नत स्तनभागाचं—छातीचं उघड्या दंडाचे शक्य तितकं नागड प्रदर्शन व्हाव! पुरुषाच्या उच्च तत्त्वाच्या गोष्टी निव्वळ बोलण्याकरता आहेत, त्याचे खरं आकर्षण स्त्रियाच्या शारीरिक सहवासात आहे, हे मिश्र–शिक्षण संस्थात शिक्षण घेतलेल्या स्त्रियाना पूर्ण माहित असत. आणि याची पूर्ण जाणीव ठेवून स्वतःच्या शरीराच शक्य तितकं आकर्षक प्रदर्शन त्या नेहमी करीत असतात.

"अनिष्ट" रूढीमुळं पचनी पडलेली वागणूक,—(अंध झालेली दृष्टि) साफ करून वरच्या वर्गाच्या लोकात काय

चाललय ते पाहू या! आपल्याला लाजेनं खाली माना घालाव्या लागतील. का? तुम्हाला पटत नाही? मी तुमच्या पदरात माप टाकतो, मग तर झालं!" मला बोलू न देताच त्याने आपलं पुराण चालू केले, "तुमचं असं म्हणण आहे की, आपल्या समाजातील कुलीन स्त्रिया आणि वेश्या (पतिता) यांच्या आयुष्याची ध्येय नि आकांक्षा वेगळया आहेत. पण मी सांगतो की तसं नाही आणि मी हे सिद्ध करून देतो.

"जीवित हेतूमध्यें जर व्यक्तींचा तीव्र मतभेद असेल—मानव जीवितास किती किंमत द्यावी यात जर वाद असेल,—तर हे अंतर त्यांच्या बाह्य वागणुकीत दिसले पाहिजे हेतूंची जशी दोन टोकं, तशीच दक्षिण—उत्तर ध्रुवासारखी त्यांची वागणूक झाली पाहिजे. त्यांचा बाह्य देखावा त्यांच्या विसंगत हेतुप्रमाणेंच विसंगत पाहिजे. उच्च समाजातील स्त्रियांच्याकडे आणि समाजातून बहिष्कृत झालेल्या आपल्या दुर्दैवी-पतित भगिनींकडे नजर टाका! काय आढळेल? अत्तर, पावडरी, कपडे आणि साबण, यांचे तेच नमुने—तेच बीन बाह्यांचे—उघड्या छातीचे पोलके व बीन कासोट्याची पातळ—दागदागिन्यांची व जडजवाहिरांची तीच हाव—तेच गाणं—तेच नाचणं त्याच त्या करमणुकी—पुरुषांना जाळ्यात पकडण्याकरताच यांचा उपयोग पहिल्या करतात, तसाच दुसऱ्याही करतात. दोन्हीत काही-काहीसुद्धा फरक नाही!"

— ७ —

"याप्रमाणे बीन बाह्यांचे ब्लाऊझ, कुरळे केस, बीन कासोट्याची पातळं यामुळें मी तावडीत सापडलो मला पकडणं अगदीच सोप होत, कारण वाघ्याच तरू जसं खत घालून

तयार करतात, तसं उल्लु गाढवं निर्माण करणाऱ्या परिस्थितींतच मी वाढलो होतो. आपलं सुग्रास आणि उत्तेजक अन्न, ना काम—ना धंदा—या परिस्थितीचा विचार करा!

" वस्तुस्थिती ही अशी आहे. यात तुम्हाला आश्चर्य वाटो अगर न वाटो! माझ्यामुद्धा हे फार उशिरा लक्षात आलं. या गोष्टीत कोणी लक्ष द्यायचं नाही आणि मग, मगाच्या त्या बाईप्रमाणे काहीतरी बरळत सुटायचं, याचच मला वाईट वाटत!"

" मागच्या उन्हाळ्यात काही शेतकरी लोक रेल्वे रस्त्यावर कामाला लागले होते. शेतात काम करताना त्याचं नेहमीचं अन्न म्हणजे आमटी—भाकर—कांदा, आणि येवढ्यावर तो अगदी सशक्त राहातो. यालाच रेल्वे कंपनीत लावला की, आठ तास काम—अन्नात भाजी-पाला, चहा वाढलाच! आता याच्या उलट आपल्याला मात्र मांस पाहिजे, मासे पाहिजे, कोंबडी—अंडी तर नेहमीचीच! शिवाय, जोडीला इतर उत्तेजक मसाले व शक्य असल्यास ब्रँडी,—आता या सर्व अन्नाचा परिणाम काय व्हायचा?

प्रत्येक बाबींत अतिरेक, अमानुष उत्तेजक सुखोपभोग—याप्रमाणे कृत्रिम जीवनाच्या विलासी अगर बहुरंगी प्रेमात पडण्यात शेवट होतो! " याप्रमाणे—इतर सर्वांप्रमाणेच मी 'प्रेमात' पडलों नि प्रेमी लोकांच्या बाह्य उपांगांपैकी कोणतीच कमतरता माझ्यात नव्हती. ब्रह्मानंद—भावनाची व्याकुळता—काव्य ही प्रेमी माण-

साची लक्षणं आमच्यातही होतीं, पण 'सुखचमेशयनंचमे' च्या माझ्या आयुष्याला प्रेमात गुंडाळायला खरोखरी तिच्या आईनं ठेवलेले पिंजरे आणि शिप्यानं कपडे बेतण्यात दाखवलेली कर्तबगारीच उपयोगी पडली! शिप्यानं आपली अक्कल पाजळली नसती, चांदण्या रात्री फिरण्याचं मी टाळलं असतं किंवा तीच जर साध्या कपड्यात घरी राहिली असती तर—अगर मला तरी वाकड्या वाटाची सवय नसती तर—मी प्रेमात पडलो नसतो! पुढे काय व्हायचं ते झालं नसतं!"



'माझ्या मनःस्थितीच्या जोडीला, तिचे कपडे, चांदण्या रात्रीच्या सफरी वगैरे मिळून शेवटी यश हे आलेच. मागे असेच प्रसंग आले, पण निभावलो! पण यावेळी फसलो आणि शेवटी पिंजऱ्यात सापडलो.

"लग्नाला मी पिंजऱ्याची उपमा थट्टेनं दिली असं तुम्ही समजू नका. या लग्नाच्या प्रकारात नैसर्गिक काय ठेवलंय? मुलगी मोठी झाली, लग्न झालं पाहिजे. लग्नाला उत्सुक तरुण असले आणि त्यांना भिचकावण्यासारखी हिडिंबेसारखी मुलगी नसेल, तर यात अवघड काहीच नाही असं तुम्हाला वाटेल. पूर्वी लग्नाचं सोपं होतं. तेव्हा मुलगी वयात येण्यापूर्वीच आईबाप लग्न ठरवून टाकीत. अजूनी चीन, रशिया अगर आपणाकडे हिंदुमुसलमानात हीच पद्धत चालू आहे. थोडक्यात पृथ्वीवरच्या मानवजातीपैकी शेकडा नव्याण्णव लोकांत हीच चाल आहे! आता हे एक टक्का बहुतेक कमीच असतील.

मानवजातीतील क्षुद्र जीव उरले, त्यानी ठरवलं की, ही लग्नाची चाल योग्य नाही आणि यानी 'नवीन पद्धतीचा शोध लावला! आता या नवीन पद्धतीत तरी विशेष काय आहे हो! तरुण लोकानी बाजारात जातो तसं जायचं आणि आशेने वाट पहात विचार करीत बसलेल्या मुलींपैकी एक निवडायची! त्याना बोलता येत नाही, पण चेहऱ्यावर काय दिसतं! हेच ना की, "माझी निवड करा! मला पत्करा!" "तिला नको, मलाच!" "माझ्या उघडया दडाकडे तरी पहा," चेहऱ्यावर जरी दिसलं नाही तरी अर्थ हाच! आणि आपण इकडून तिकडे न्याहाळत हिंडत असतो, अन्तःकरणाला समाधान वाटते, पण मनात काय चाललेलें असते. हेच ना की, माझी खात्री आहे. मला कोणी पत्करणार नाही अशारितीनें आपल्याकरता काय सुंदर व्यवस्था केली आहे असा विचार करीत आपण हिंडतो आहोत. तोंच आपल्यातला कोणता तरी जीव 'प्रेमात' पडतो—पिंजऱ्यात सापडतो!

"म्हणजे, मग कसं असावं म्हणता?" मी विचारलं, "मुलींनी येऊन मुलाना मागणी घालणं तर तुम्हाला आवडणार नाही!"

"खरोखरीच कसं असावं हे मलाही सागता येत नाही; तरीपण बरोबरी पाहिजे तर मग खरोखरीची बरोबरी तरी असू दे!"

"धदेवाईक भटाकरवी लग्न जमवणं कमीपणाचं वाटत असेल, तर 'नवीन पद्धत' हजार पटीन जास्त कमीपणाची आहे;

पूर्वीच्या पद्धतीत दोघानाही सारखेच हक्क आणि धोके होते, पण आता मात्र स्त्रियांना बाजारांतलं गुलाम तरी केलंय किंवा माणसं पकडण्याचा गळ तरी बनवलंय खास!

" एकाद्या बाईला अगर मुलीला स्वतःकरता नवरा पकडण्याकरतां ही खटपट आहे, असं खरं सांगा बापरे! शेवटीं आकाश पातळ एक करतील. केवढा अपमान! आणि त्यांच्यापैकी प्रत्येजण हेंच करींत आहे. इतकेच नव्हे, तर याशिवाय त्याना दुसरा उद्योग नाही. आणि गरीब, तरुण, निष्पाप मुलींना याच व्यवसायांत पाहिलं की काळीज फाटतं! हे जरी वाइट असलं तरी हेच उघडपणाने केलं असतं तर इतकं वाईट वाटलं नसतं, पण हे सारं फसवेगिरीनं प्रतिष्ठितपणाच्या बुरख्याखाली चालवलेलं आहे.

"' वा? ' Origin of Species ' ' किती सुंदर ग्रंथ '! एकादीची आई उच्चारील. ' इंदूला किनाई चित्रकलेचा भारीच नाद ' ' काय, तुम्ही सिनेमाला जाणार? ' ' भारीच चागला म्हणतात! ' ' नवी मोटार घेतलीत, ' ' सिनेमा ' ' जलसा ' ' किती मौज ' ' इन्दूला गाण्याचा फारच शोक! ' ' बाई! तुम्हांला आहे ना याचा नाद! " ' बोटिंग पार्टी ' ' वा! किती चांगली सफर "

या सर्व उच्चारांच्या मागे अर्थ आणि विचार मात्र एकच— आणि हाच! सरळ वाक्यांत घातलं तर ' मला निवडा. मेहरबानी करून मला पत्करा, ' ' इन्दूला पत्करा ', ' मला पत्करा! ' नीच! ढोंगी! "

— ९ —

त्यानं उरलेला चहा संपवला आणि कपबशा गोळा करायला सुरवात केली.

" बायकांच्या वर्चस्वाचं हे मूळ आहे आणि त्यामुळें सर्व जगाला दुःखं भोगावी लागत आहेत." त्यानें सुरवात केली.

यात बायकांचं वर्चस्व कसलं !" मी विचारलं, " उलट पुरुषानाच हक्क, अधिकार, सवतेसुभे आहेत !"

" होय हो ! मी तरी तेच म्हणतोय !" मध्येच त्याने उत्तर दिलं, " एका दृष्टीनं स्त्रियाना जरी अगदी अपमानाच्या खालच्या पायरीवर आणलं तरी आज त्याच सर्वशक्तिमान् का आहेत याचं उत्तर यातच आहे. याबाबत कंपनी सरकारची आणि स्त्रियाची स्थिती अगदी सारखी आहे. एका बाबीतील जुलुमाची भरपाई दुसऱ्या बाबीत अधिकारानी व स्वतःचं वजन वाढवून सरकारनं भरून काढलं, त्याचप्रमाणं स्त्रियांचं आहे ! " आम्ही नुसते व्यापारी काय ? ठीक आहे व्यापारानीच तुमच्यावर वर्चस्व मिळवूं !" तसंच बायकाच, आम्ही सुखोपभोगाची साधनं, काय ? ठीक आहे ! तुम्हाला आम्ही गुलाम बनवूं !"

निवडणुकींत मत नसणं, कौन्सिलात जागा नसणं, अगर राज्यकारभारात भाग नसणं, यात खरोखरी त्याचं काही जात नाही; पण स्त्री–पुरुष भेदावर अवलंबून असलेल्या सामाजिक कृत्यात जो कमीपणा तिच्या पदरी येतो, त्यात मात्र त्याचं नुकसान आहे यामुळें त्यांना नवरा निवडता येत नाहीं, तर नवऱ्याने निवडेपर्यंत वाट पहावी लागते !

'हे हक्क बायकांना दिले गेले तर भयंकर होईल, असं का तुम्हांस वाटते ? ठीक, आहे ? मग, पुरुषाचेही हक्क नष्ट करा. पुरुषाच्या या सवत्यासुभ्यामुळें स्त्रियांचे जें नुकसान होत असेल, त्याचा वचपा काढण्याकरता त्या पुरुषाच्या अन्तःकरणाचाच कबजा घेऊन त्यांना गुलाम बनवतात—त्याची सारासार विचार करण्याची शक्तीच नष्ट करतात व मग त्याला हाताला हात लावून "मम" म्हणण्या पलीकडे—असलेल्या अधिकाराचा विचारपूर्वक उपयोग करण्याची शक्तीच राहात नाही. म्हणजे वस्तुस्थिति अशी की, निवड करण्याचा हक्क तिच्याकडे—रहातो आणि एकदा का मान्याच्या जागा तिच्या हाती आल्या की, पुरुषावर तिचा भयंकर जुलमी अम्मल सुरू होतो !"

"पण हे स्त्रियांचे सामर्थ्य कशात दिसतंय ?" मी विचारले.

"प्रत्येक गोष्टीत आणि प्रत्येक ठिकाणीं" त्यानें उत्तर दिले. "शहरातून फिरताना काचेच्या तावदानातील मांडलेल्या निरनिराळ्या वस्तूंच्या प्रदर्शनाकडे लक्ष टाका ! किती अगणित संपत्ति आणि मानवीश्रम या जिनसा तयार करण्यात खर्ची पडले असतील याची तुम्हाला कल्पनाही येणार नाहीं ! जरा बारकाईने पाहाल, तर शेकडा नव्याण्णव दुकानांतून पुरुषाच्या उपयोगाची एकही जिन्नस आढळणार नाहीं. सुखोपभोगाच्या वस्तूची गरज,. उगम, व्यापार व अस्तित्व स्त्रियामुळें आहे व स्त्रियांकरता आहे. उगीच, देशातल्या कारखान्याकडे नजर टाका, त्यांतील बहुतेक कारखाने निरुप-

योगी दागदागिने, सौंदर्याचीं साधनं, फर्निचर, खेळ इ० तयार करण्यात—फक्त बायकांनाच उपयोगी पडणाऱ्या जिनसा तयार करण्यांत—गुंतलेले आढळतील! स्त्रियांच्या विचित्र लहरीच्या समाधानाकरतां लाखो लोक—त्यांच्या पिढ्यांन पिढ्या आज कारखान्यांत कुजत आहेत—त्यांतच नष्ट होत आहेत नव्याण्णव टक्के मानव जातीला आज स्त्रियांनी एकाद्या सम्राज्ञी प्रमाणें—सक्तमजुरीच्या तुरुंगवासाची शिक्षा दिलेली आहे.

स्त्रियाना खालची पायरी दिलीत. त्यांना समान हक्क दिलें नाहीत. याबद्दलच्या सूडाचं भूत आज यारुपाने पुरुषाच्या मानगुटीवर बसलं आहे. याप्रमाणें कलाकौशल्यपूर्वक निर्माण केलेल्या मयसभेचा, चुक्यांचा आपल्या इंद्रियावर परिणाम होऊन आपण सर्व त्यानीं पसरलेल्या जाळ्यांत सापडतो. अनैसर्गीक जीवनक्रमाच्या मूळाचं हें कारण आहे. आपण स्त्रीयाना सुखाचं साधन समजतों, त्यांनीही हें उपभोगाचं साधन इतकं भयंकर केलं आहे की, पुरुषाला शान्त अंतः-करणानं त्याच्या आसपाससुद्धां फिरता येत नाहीं. एकाद्या स्त्रीच्या जवळपास जातांक्षणचि तिच्या मंत्राचा प्रभाव त्याच्यावर होऊन त्याची विवेकाची सर्व साधनंच लुळी पडतात. पूर्वीसुद्धां सर्व साधनानं नटलेली बाई पाहिली कीं, मला कसंसच वाटत असे. आतां तशी बाई पाहिली की, धक्काच बसतो. कारण त्या अस्तित्वानं सार्वजनिक लोकांना धोका आहे हे मला स्पष्ट दिसतं, आणि असा धोका असणं

कायदेशीर नाहीं हे पटून या धोक्यापासून रक्षणाकरता पोलीसांची मदत मागावी, धोका नाहीसा करावा, दृष्टी आड तरी करवा, अशी इच्छा होते!

" का तुम्हाला हसूं येतंय!" माझ्याकडे पहात तो बोलला. "पण मी खात्रीनें सांगतो ही हसण्यावारी नेण्याची गोष्ट नाही! लवकरच एक अशी वेळ येईल कीं, लोकांचे डोळे खाडकन् उघडतील, आणि वर सांगितलेल्या कृत्याप्रमाणे सार्वजनिक शांततेला आणि सुरक्षिततेला असलेले संकट आपण समाजात कसं वावरूं दिलं—आणि तो समाज टिकला कसा, याबद्दल आश्चर्य करूं लागतील—सार्वजनिक रस्त्यावर अगर इतर ठिकाणी जाळी पसरलीत अगर पिंजरे लावून ठेवणं-आणि पुरुषांना भुलवेल असा शृंगारिक पोषाखात स्त्रियांना वापरूं देणे—हे सारखंच नाही का? स्त्रियांच्या ज्या शृंगारसाजाकडे आपला समाज कानाडोळा करीत आहे आणि ज्या शृंगाराचा उद्देश पुरुषाचे मनोविकार उद्दिपीत करणें एवढाच उघड उघड आहे—त्यामधें समाजाला धोका नाहीं असें म्हणण्याचे ढोंग क्षणभर तरी करतील काय? जिविताला धोका देणाऱ्या खेळाला मात्र कायद्यानं बंदी आहे, मग देहभान हरपणारे मोहक कपडे वापरण्यास स्त्रियांना कां बंदी नाहीं? एकाचा जीव घेणारा पाहिला खेळ पुरवला, पण लाखांचे जीव घेणारा हा नटवा पोषाख नको!

— १० —

" याचप्रमाणें मीसुद्धां जाळ्यांत सापडलों. म्हणजेच काय म्हणतात ते—' प्रेमांत पडलों. ' याप्रमाणें आमचं एकमेकांच

त जमलं असताना मी तिलाच सर्व गुणांची पुतळी समजत तो असं नाहीं, तर स्वतःलासुद्धा मानवी गुणाचा आदर्शवत् तळा मानीत होतो. जगात शेराला सव्वाशेर आहे व हें जरी हमीं आपण चागल्या अर्थानें घेतो तरी जरा बारकाईनें चार कराल तर तुम्हांला जगात ' चोरावर मोर ' ही पण ाढळतील, याच विचारानं माझ्याबद्दल अभिमान वाटे व माधान वाटे !

" ही एकंदर माझी हकीगत. मी पैशावर नजर देऊन लग्न लं नाही. हुंड्याची अभिलाषा अगर नातेवाईकांच्या वजनाची शीलेबाजीची आशा माझ्या काही स्नेह्याच्या लग्नाच्या बाबींत ोत्या. पण—पैशाचा मोह माझ्या या नीवड करण्यांत नव्हता. ी श्रीमंत तर ती अगदीं गरीब. हा एक विचार, दुसरं इतर ोकानी लग्नापूर्वीच्या रात्रीच्या वाटा व पत्ते लक्षांत ठेवून व याचा पुरा उपयोग लग्नानंतरही करण्याचे नक्की ठरवून लग्नं ली, पण मी मात्र माझ्या बायकोशी एकनिष्ठ राहण्याचा नश्चय केला होता व याबद्दल मला आतिशय अभिमान वाटत ाता. अहो, कित्येक वेळां या गुणामुळे मी स्वतःला ' संत ' द्धा समजत होतो.

" वाङ्निश्चय आणि प्रत्यक्ष लग्न यामध्ये काही फार दिवस ले नाहींत, पण त्या दिवसाची आठवण झाली की, लज्जेनें ान खाली घालावीशी वाटतें. किती लाजीरवाणी गोष्ट ! ज्या जरज्जूंनी आम्ही एकत्र बाधलों गेलों, ते ' प्रेम '—' स्वर्गीय ' मजायचं बरं कां ? पण जर आमचं ' प्रेम ' आणि सह-

संवेदना आणि स्वर्गीय, तर आमच्या शब्दातून, वाक्यांतू संभाषणातून हें स्पष्ट दिसायला नको का? खरोखरी यापैकं काहीच दिसलं नाही. उलट आम्ही दोघेच असलों की, बोलणंच कठीण होई, कुत्र्याचं शेंपूट सरळ करण्याचा प्रयत्न! मी काही तरी बोलण्याचा प्रयत्न करी—बोले पण पुन्हा आपल तोंड बद—पुन्हा काय बोलावं म्हणून डोकं खाजवावं! खरं म्हणजे बोलण्या सारखंच काही नव्हतं! नवीन आयुष्यातील भविष्यकाळचे मनोरे आणि बेत बोलून संपले. आता पुढें काय बोलणार? जनावरं असतो, तर आपल्या बोलण्याची आपण अपेक्षा तरी करीत नाहीं, पण आम्ही नुसतीच जनावरं नसल्यामुळे बोलणं तर भाग पडायचं आणि बोलण्यासारखं तर काहीच नसायचं? आता यातच भरीला 'बाबा वाक्यं प्रमाणं' म्हणून लग्ना-पूर्वीच्या केळवणी, सुग्रास जेवणं, नवऱ्या मुलीच्या कपड्या-लत्त्याची खरेदी, वराचा पोषाख, मांडव, वाजंत्री, भटजी वगैरे वगैरे उद्वेगजनक पद्धती लक्षांत घ्या म्हणजे झालं!

आता मगाच्या व्यापाऱ्याच्या म्हणण्याप्रमाणें आपलं लग्न जर पूर्वीप्रमाणें आईबापाच्या पसंतीने व संमतीने होत असेल, तर हुंडा-पांडा, वरपूजा वरदक्षणा अगर न्हाणावली आणि गर्भदान त्यांना धार्मिक संस्काराबरोबर तपशिलापेक्षा जास्त कोणी किंमत देणार नाहीं; पण आपल्या देशात संसारात पडणाऱ्या दहा जोडप्यांपैकीं एकही असं मिळणार नाही की, ज्याचा संतती निर्माण करण्याच्या पलीकडे लग्न—संस्कारावर विश्वास आहे! शंभरांत एकही असा आढळणार नाही कीं,

ज्यानें लग्नाच्या अधिच अनेक लग्नाचे उपभोग घेतले नाहीत आणि पन्नासात असा एक मिळणार नाही की संधी मिळाली तर आपलं पौरुषत्व गाजवायला तयार होणार नाही. आपल्या देशात बहुतेक लोक लग्न-विधिचा अर्थ इतकाच समजतात की, त्याला एका स्त्रीचा कबजा घेण्याचा अधिकार प्राप्त होतो!

---- ११ ----

"याप्रमाणे सर्वांची लग्नं होतात. माझंही लग्न असेच झालें. यानंतर कवी वर्णन करतात—त्या रसभरीत वर्णनासारखा Honey Moon सुरू झाला. नुसत्या नावातसुद्धा किती रसभंग असतो.

"एक दिवस शहरातून हिंडताना" तो बोलत होता, "माझ्या नजरेस एक बाईचा पुतळा पडला. त्या बाईला दाढी होती व शेजारी एक पाणघोडा होता. मी आत जाऊन पाहिलं तर बाई म्हणजे ती बाईचे कपडे घातलेला एक माणूस, आणि पाणघोडा म्हणजे एक साधं कुत्र, पण कातडं पांघरलेलं—डबक्यात पोहत होत. पाहण्यासारखं खरोखरीच काही नव्हतं. परत येताना त्या प्रदर्शनाचा मालक जणू काय, मला मान देण्याकरता माझें बरोबर आला आणि त्यानें तिथें जमलेल्या लोकाना सांगायला सुरुवात केली. "बिचारा! यानाच बिचारा खेळ पाहण्यासारखा आहे की नाही! चला, गर्दी करा!! माणशीं दोन आणे?" खरोखरी खेळात कांहीच नाहीं हे सांगण्यास मला लाज वाटत होती आणि या वाटण्यावरच—

बोलताना त्याची सर्व मदार होती. याप्रमाणं ( Honey Moon ) चा अनुभव घेतलेल्याची स्थिति हीच आहे; पण या गाढवपणाच्या अनुभवाचा उपयोग ते इतराचा भ्रम निरास करण्यास उपयोग करतील. मीही कदापि करणार नाही; पण मी आता खरं का सांगू नये समजत नाही. उलट याबाबद सत्य सांगण्याची जबाबदारी माझेवर आहे असेच मी समजतो.

" अगदी वस्तुस्थिति म्हणजे तो काल अत्यंत कंटाळवाणा, दुःखदायक आणि सर्वांत जास्त म्हणजे त्याच त्या गोष्टींमुळें निर्जीव—अगदी कल्पना करता येणार नाही इतका निरस! ज्यावेळी मी पूर्वी सिगारेट ओढायला शिकत होतो, त्या वेळची आठवण होते. पहिलाच झुरका—आणि मला पोटात ओकारी येईलसे वाटूं लागलं! अजारीपणाचं पूर्व चिन्हच ते! तोंडाला लाळ सुटू लागली, पण मी चटकन गिळून एकंदरीत सिगारेट बरी वाटते आहे असं दाखविण्याच्या प्रयत्नास लागलो."

" हनीमूनच्या प्रकाराबद्दल फारच विचित्र बोलताहांत." मी सांगितलं, " स्त्री-पुरुष लग्नानंतर पहिला आनंदाचा बहार लुटण्याकरता एकत्र राहिले तर त्याचें जीवन नीरस होईल, याच तत्त्वावर जर बोलूं लागलांत तर मानवजात टिकणार कशी?"

" खरं आहे. काय करायचं! नाहीतर मानवजात नामशेष होईल नाही?" नीतीच्या नावाखालीं या हरकतीची जणूं तो वाटच पहात होता. उत्तर देण्याकरता छद्मी आवाजांत तो बोलला, " श्रीमंताना आणखी श्रीमंत व्हायचं असेल तर

जन्मापासून ब्रह्मचर्य पाळायला शिकवा, तुम्हांला कोणी दोष देणार नाही, पण नीतिमत्तेच्या नावाखालीं संतती न होणं किती आवश्य आहे, असं नुसतं ध्वनीत करा, बापरे!! केवढी बोंबाबोंब उडेल!

"माफ करा हं! त्या दिव्याचा मला त्रास होतोय! दिव्या-कडे पहात तो बोलला," जरा त्यावर झाकण टाकूं का?" माझी काहीच हरकत नाही असं कळताच नेहमीच्या झटक्यात तो उठला व बाकावर चढून त्यानं त्यावर लोकरी झापड बसवली.

"असं जरी असलं--" मी म्हणालो, "प्रत्येकानं अगदी कायदा म्हणून वागणुकीकरता तुम्ही म्हणता ते तत्त्व मान्य केलं तर थोडे दिवसात मानवजात नाहीशी होईल."

त्यानं उत्तर देण्यास थोडा उशीर लावला.

"मानवजातीस आपला नाश कसा टाळावा हे जाणण्याची इच्छा आहे." माझ्यासमोर बसत, पाय लांब ताणून व त्यावर आपले ढोपर ठेऊन तो बोलला"—

"पण आपणाला जगण्याचं कारणच काय?" जर आपल्या जीवितात काही हेतु नसेल—नसेल--नसेल—नुसतं आयुष्य जग-ण्याकरता जगायचं, तर त्या जगण्यात काही अर्थ नाहीं. आणि हें खरं असेल, तर शोपेनहार व गौतमबुद्ध याचंच म्हणणं बरोबर आहे, उलटपक्षीं मानवी—जातीचा अंतिम काहीं हेतु असेल, तर तो हेतु सिद्ध होताच मानवी जात नष्ट झाली पाहिजे. ही अगदी स्पष्ट गोष्ट आहे." भावनापूर्ण आवेगाने आणि स्वतःच्या विचाराला मान देत तो बोलला.

" हो! हे अगदी स्पष्ट आहे. आता माझे शब्द नीट ध्यानात ध्या. जर मानवजातीचा हेतु आनंद आणि प्रेम हाच असेल किंवा त्या ध्येयाला कोणतंही नाव द्या, व साधुसंतांच्या वाक्याप्रमाणे सर्व मानवजातीत प्रेम पाहिजे, ती एकाच परमेश्वराचीं लेकरं आहेत, तर मग तलवारी मागं पडून त्याचे नागर का बनत नाहीत. हा हेतु साध्य होण्याच्या मार्गात अडचण कोणती? अर्थात काम–क्रोध वगैरे मनोविकार! अर्थात या सर्व विकारात दुष्ट, हट्टी व बलवान–म्हणजे कामविकार! जर या सर्व विकाराची विशेषतः कामविकाराची हकालपट्टी केली की, संतवचनं खरीं ठरतील आणि माणसात प्रेमभावना नांदू लागेल. मानवजातीचे ध्येय संपादन होऊन जीवित–कार्य संपेल नि नंतर मानवजातीच्या अस्तित्वाचं कारणच उरणार नाही.

" मानवजातीच्या अस्तित्त्वापर्यंत काहीतरी ध्येय हें राहणारच. आणि कुत्र्या मांजरासारखी नुसती लोकसंख्या वाढवणं हें काही मानवजातीचे ध्येय खास नव्हे! हे ध्येय म्हणजे सात्विकता, संयमी मितोपभोग! या ध्येयाकडे माणसाच लक्ष आहे, ध्येय गाठण्याचा प्रयत्न आहे,

" आता याचा परिणाम काय, तो पहा! प्रेम–कामविकार याचा उपयोग सेफ्टीव्हॉल्हप्रमाणे आहे. हल्लीच्या पिढीकडून त्याच्या जीवित हेतूचं कार्य सफल झालं नाही. आणि तें का! कारण मनोविकार–सर्वांत जास्त बलिष्ठ कामविकारामुळें–नवीन पिढी निर्माण होते–आणि मनुष्यजातीला या नवीन पिढीमार्फत ध्येय साध्य होण्याची शक्यता निर्माण होते. ही नवीन पिढीसुद्धां याच कारणामुळें अयशस्वी झाली तर, ' जो पडेल तो

चढेल' या नियमानं पुन्हा ध्येयसिद्धीची शक्यता निर्माण होत आणि असं जगाच्या अन्तापर्यंत—ध्येयसिद्धीपर्यंत सर्व मानवजात एकीनं दृढ होईपर्यंत चालणारच!

"जर याच्या उलट परिस्थिति असती तर काय झालं असतं? समजा, उदाहरणार्थ, परमेश्वरानं माणसाना एकाच ध्येयपूर्तीकरता जर कामविकाररहित आणि मर्त्य अगर अमर करून निर्माण केल असतं, तर काय झालं असतं? पहिल्या बाबीत ध्येयपूर्ति न होताच मानव—जात नाहीशी झाली असती, त्याचें जीवितकार्य सफल झाल नसतं आणि परमेश्वरास निर्मित कार्य चालू ठेवण्यासाठी दुसरी काहीतरी व्यवस्था करावी लागली असती. दुसऱ्या बाबीत म्हणजे जर माणसं अमर-असती तर, कल्पना करा की, हजारों वर्षांनी त्याचे ध्येय साध्य होईल—(हे गृहीत धरून चालण चुकीचंच आहे. कारण, आपली चूक सुधारून स्वतःची वागणूक बदलणं हे त्याच—लोकापेक्षा नवीन पिढीस- मागिल चुका दुरुस्त करून पूर्णत्वास जाणं सोपं आहे. 'पुढच्याम ठेंच मागचा शाहणा' च)—अमर असल्यामुळे त्यानी यानंतर का जगायचं आणि त्याचें पुढे ध्येय काय राहणार? यानतर याचा उपयोग काय? अर्थात आहे हीच परिस्थिति बरी आहे.

"कदाचित् ज्या पद्धतीनं मी हें सांगितलें, हें तुम्हांला आवडणार नाही? कदाचित् तुम्हांला 'उत्क्रांतिवाद' मान्य असेल. पण तसं असेल तर माझ्या म्हणण्यातलं सत्य तुमच्या नजरेंतून सुटणार नाही. प्राणिशास्त्रांतील सर्वांत उच्च

म्हणजे मानव जात. इतर जातीपासून स्वतःचं रक्षण करण्या-करतां त्यानी एकमेकास मर्यादित चिकटून राहिलं पाहिजे, मधमाशाप्रमाणे समाज करुन राहिलं पाहिजे, नुसती संतती वाढवून भागणार नाही. मधमाशाप्रमाणे निव्वळ कामकरी माशा जशा असतात, तसे कामविकाररहित स्त्री-पुरुष वाढवले पाहिजेत. त्याना उत्तेजन दिलं पाहिजे. म्हणजेच त्याना संय-माचे ज्ञान दिले पाहिजे. कामविकारास प्रोत्साहन मिळेल अशा गोष्टी टाळल्या पाहिजेत. कामविकाराचा अग्नि धुमस-विण्याचा जो प्रकार हल्ली समाजात चाललाय, तो थांबला पाहिजे !

काही वेळ तो स्तब्ध बसला, नंतर त्याने पुन्हा सुरवात केली. " मानवजात नष्ट होईल ? होय. कोणत्याही दृष्टीनं तुम्ही जगाचा विचार केलात, तरी कोणाला तरी याबद्दल शंका असेल का ? मृत्यु इतकीच न चुकणारी ही बाब आहे. जगाचा आज ना उद्या अन्त होणार, यावरच सर्व धार्मिक तत्त्व प्रस्थापित आहेत आधुनिक शास्त्रंसुद्धा हेच शिकवतात. नीतिशास्त्रानं हाच धडा गिरवला, तर आश्चर्य कसलं ?

इतकं बोलून बराच वेळ तो स्तब्ध बसला. त्याने अगदी टोकापर्यंत सिगारेट ओढून फेकून दिली. जवळच्या डब्यातून सिगारेट काढून जुन्या व खराब झालेल्या सिगारेट—केसमध्ये त्या भरल्या.

" तुमची भूमिका समजली." मी म्हणालों, " तुमची कांही अंशी अमेरिकेतील शेकरपंथीय लोकाच्या सारखी, तुमची भूमिका दिसते !

"होय! होय!! त्याचं, अगदी बरोबर आहे!" तो उद्गारला, "कामविकारास तुम्ही कितीही व कशीही जरी बंधनें टाकली, तरी तो धोका आहे. एक भयंकर संकट आहे. त्याचेविरुद्ध लढाई पुकारून जयच मिळवला पाहिजे! आपल्या समाजात चाललंय त्याप्रमाणे त्याची जोपासना करून भागणार नाहीं—( सापाला दूध पाजणं आहे )—संत वचन. स्त्रीकडे कामी नजरेनें पाहाणाऱ्याचे हातून अन्तःकरणात त्या बाईबाबद व्यभिचारच होतो. निवळ दुसऱ्याच्याच बायकापुरतं नसून ते स्वतःच्याच बायकोच्या बाबतीत खरं आहे. जगाच्या आजच्या राहटींप्रमाणे चालू मतं जशी खरी असावयास पाहिजेत याच्याविरुद्ध आहेत. आज लग्नाचे प्रवास व सफरी—लग्न झालेल्या तरुण—तरुणींचा वडील माणसांच्या परवागीनं एकान्त—हे अमर्याद सुखोपभोगाचे परवानेच नव्हेत का ?

## — १२ —

" पण नीतीचा कायदा पायदळी तुडवल्याबदल आज ना उद्या योग्य प्रायश्चित भोगावंच लागतं! याप्रमाणे मधुचंद्राचे बाबद मला यश न येता सुखाकरता केलेले सर्व प्रयत्न फसले. लाजेचा आणि कंटाळवाणा असाच तो काळ गेला व लवकरच त्याच्या असह्य यातना वाढू लागल्या.

" थराला गोष्टी जरा लवकरच आल्या. एक दिवस मला बायको थोडी कंटाळलेली दिसली—लग्नाचा तिसरा किंवा चवथा दिवस असेल तो. तिला मी निराशेचं कारण विचारलं, आणि

बाहुपाशात कुरवाळण्यास सुरुवात केली. माझ्या समजुतीनं माझ्यापासून तिची एवढीच अपेक्षा असेल, पण तिनं माझे हात झिडकारून टाकले व अश्रु गाळण्यास सुरवात केली. "

" काय झालं? " ती बोलूं शकत नव्हती, पण ती दुःखी आणि गळल्यासारखी दिसत होती. तिच्या प्रेमाचें शारीरिक संबंधात रुपांतर झालं. त्याचा भार तिच्या मज्जातंतूवर पडला होता. त्यावेळी जे काय वाटलें ते तिला स्वतःला ठरवता येईना मी सारखा विचारीतच होतो, व आईशिवाय आपल्याला करमत नाही असें काहीतरी ती पुटपुटली. मला हे खरं वाटलं नाहीं, पण तिच्या आईचा उल्लेख न करता मी तिचं समाधान करुं लागलो. आईवीण एकट वाटतं ही मला नुसती सबब वाटली, आणि तिला मानासिक दौर्बल्य आलं आहे हें माझ्या लक्षात आलें नाही. समजूत घालण्यात आईचा उल्लेख नाहीं एवढाच तिला अपमान वाटला मी तिच्या बोलण्यावर विश्वास ठेवित नाहीं, असं तिनं सांगितलं. माझं तिच्यावर प्रेम नाही हे आज लक्षात आलं. ती म्हणाली, यावर मी तिला लहरी म्हणून दोष ( Rebuke ) दिला मात्र! तोंच तिच्या चेहऱ्यात एकदम फरक पडला. आतापर्यंत तिच्या चेहऱ्याकर दुःखाची छाया दिसत होती. त्याची जागा चिडखोरपणानें घेतली. हृदयभेदक शब्दांनी मी स्वार्थी–निर्दय आहे असं म्हणून तिनं माझी नालस्ती चालविली ( मी म्हणजे नीतीच्याबाबत कामापुरता मामा आहे, असं तिचं म्हणणं पडलं. ) मी अगदी भेदकदृष्टीनं तिचा चेहरा पाहिला.

त्या चेहऱ्यावर माझेबद्दल प्रेमाच्या सद्भावनेचा लेशही दिसला नाही. उलट माझ्याविरुद्ध शत्रुत्व–खरं सागायचं-द्वेषच दिसला.

"मला केवढा भयंकर धक्का बसला, तें मला अजूनही आठवतं आहे! याचा अर्थ तरी काय? असं कसं होईल! प्रेम! दोन हृदयाचं मीलन! या परिणामाऐवजीं हें फळ काय? हें शक्य तरी आहे कां!" मी मनाशीं विचार केला, "खास आताची ही–पूर्वीची ती नव्हे!"

"मी गोड बोलून तिला शान्त करण्याचा प्रयत्न केला, पण कधीही पाझर न फुटणाऱ्या पाषाणाशी आणि दात धरून राहणाऱ्या विषारी शत्रुत्त्वाशी माझी गांठ आहे हे माझ्या लक्षांत आल! मी अशा रीतीने डिवचला गेल्यामुळें भयंकर चिडलों व शेवटी त्याचा परिणाम म्हणजे आम्ही एकमेकाना .तोंडाला येईल ते बोललो!"

"या पहिल्याच भाडणाचा माझ्या अन्तःकरणावर भीतीचा भलताच परिणाम झाला. मी भाडण म्हणालों पण तें भाडण नव्हे! आम्हा दोघामध्यें लग्नानंतरसुद्धां जी प्रचंड दरी आड वासून उभी आहे, तिचा मला शोध लागला. ज्याला आम्ही प्रेम म्हणत होतो, त्याचा निकाल लागला होता, आणि नैसर्गिक स्त्री-पुरुषसंबंधापुरतंच आम्ही आता एकमेकाकडे पहात होतो. तोंडसुद्धा न पाहिलेल्या स्वार्थी जीवांची ही झुंज होती!"

"आमच्यात उडालेल्या या झटापटीला मी 'भांडण' असं म्हटलं. पण छे! तें भांडण नव्हे, तर आमच्या दोघांतल्या नैसर्गिक- नात्याची ती नुसती तोंडओळख होती! एकमेकांत

भावना नसणे हेंच नैसर्गिक—दोघांत शत्रूत्त्व असणं हेंच नैसर्गिक—पण हे माझ्या लक्षात त्यावेळी आलं नाहीं. लग्नानंतर प्रथम प्रथम 'प्रेमा' च्या सुरानं पुन्हां या भावना आमच्या नजरेतून सुटल्या. आम्ही भाडलों पुन्हां एकी झाली, आणि पुन्हा असा गैरसमज होणार नाही असं मला वाटलं !"

"पुन्हा लवकरच एक महिन्यातच दुसऱ्या हप्त्यास सुरवात झाली. यावेळीं काहीं काळ एकमेकाची एकमेकास गरज वाटेनाशी झाली. याचा परिणाम म्हणजे पुन्हा भांडण झालं. या दुसऱ्या गैरसमजाचा माझ्या मनावर चांगलाच ठसा उमटला ! "पहिलं भांडण काहीं अकारण—अपघाती नव्हे तर-" मी मनाशीं विचार केला, "गरजेच्या पोटींच पहिल्या भांडणास सुरवात झाली आणि पुन्हा गरज हीच पुढील भांडणात गुण ठरणार !" दुसऱ्या भांडणाला किती क्षुल्लक व मूर्खपणाची सबब होती, याचाही मला जबर धक्का बसला. पैशासंबंधी हे भांडण झालें. पैशाकरता बायकोला दोष देण्याचं माझ्या स्वप्नातसुद्धां येणार नाही; पण तिनं माझ्या एका सरळ सूचनेचा असा काहीं भलताच अर्थ केला की, मी सर्व पैसा माझा एकट्याचाच समजतोय आणि त्या पैशाच्या जोरावर तिच्यावर जुलमी वर्चस्व मिळवूं पाहतो आहे. हा आरोप सर्वस्वी खोटा—मूर्खपणाचा—बदनामीकारक व अनैसर्गिक होता.

"माझा तोल सुटला व तिच्यात सौजन्य नसल्याबद्दल मी तिची चंपी केली. तिनंही आपलं तोंड सोडलं. आणि तिच्या चेहेऱ्यावर आणि डोळ्यात मला तोच निर्दयपणा आणि

ुनशी शत्रुत्वाची चमक दिसली. माझ्या हृदयाचं पाणी झाल.

"आम्हा भावाभावांत अगर माझ्यात–वडलात भांडणं ाल्याचं मला आठवतं. आता आम्हा नवरा–बायकोत जशी ्क विशिष्ट जालीम द्वेषभावना निर्माण झाली, तशी त्या ाडणात कधीच नव्हती. पण, थोड्याच दिवसात आमच्यां-ल्या या द्वेषाग्नीवर प्रेमामुळें राख पडली–खरा द्वेषच पण ्माच्या वेषात वावरूं लागला.–आणि ही दोन्ही भांडणं ्हणजे चुकाच. नुसते गैरसमज–सहज दूर केले जातील अशी ाझी मीच समजूत केली. तिसऱ्या आणि चवथ्या भांडणात ाझा हा भ्रम निरास झाला. ही भांडणं उगीच अनपेक्षित ाकतालीय न्यायानं झाली नव्हती–गैरसमजामुळे नव्हती–तर ारज म्हणून होती. याशिवाय दुसरं काही होणं शक्य नव्हतं, ाणि पुन्हा असे प्रसंग वारंवार येणारच !

भविष्यकालाचं कल्पनाचित्र डोळ्यापुढं आलं की, माझं ्दय थांबण्याची वेळ येई ! स्वतःच्या मनोराज्याच्या सर्वस्वी वेसंगत असं 'बदसूर जोड्या' चं आयुष्य माझ्या एक-्याच्या नशिबी भोगण्याचं आहे, या विचाराने हें दुःख ास्तच वाटत असे. आम्हा दोघापेक्षां इतर लोक जास्त ाग्यवान आहेत असंच वाटे ! 'सब भाई बारा टक्के' हे ला त्यावेळी माहित नव्हतं. प्रत्येकजण–मी समजत होतो याप्रमाणेंच–स्वतःला एकट्यालाच दुःखी समजतो–अगदी वतःला अपवाद समजतो. हें दुःख ते इतरापासून लपवतात तकंच नाहीं, तर त्याचाच हे 'सुख' असा अर्थ वतःशी करूं लागतात !

" आमच्या बाबतीत लग्नानतर लागलीच या गोष्टीस सुरुवात झाली आणि दिवसेदिवस त्याची तीव्रता नि रानटी-पणा वाढतच गेला. लग्नानंतर थोड्याच दिवसात मी मनांत ठरवलं की, आपण अडचणींत सापडलो आहोंत—आपल्या आशा—अपेक्षा—आकांक्षाचा निकाल होऊन—निराशा पदरीं आली आहे. माझं लग्न सुखाचं मूळ नाही तर दुःखाचं असह्य ओझं आहे; पण इतराप्रमाणेच हे मी कबूल करायला तयार नव्हतो. ( आणि त्याचा कायमचा निकाल लागला नसता, तर अजूनी कबूल केलं नसतं. )—इतराजवळ कबूल करायला नव्हे—तर स्वतःशीसुद्धा कबूल करायला तयार नव्हतो !

" आता ज्या वेळी मी विचार करतो, त्यावेळी मी वस्तु-स्थितीबाबद इतका अंधळा कसा झालों, हेंच मला रहस्य वाटतं! अगदी क्षुल्लक कारणावरुन आमची भाडणं होत असत, ह्या परिस्थितीचं याचं उत्तर स्पष्ट आहे. भाडणाचं मूळ इतकं क्षुल्लक की—भाडण सपल की—आम्ही का भाडलो हे सुद्धा लक्षात येत नसे! आमच्या कायम वसत असलेल्या द्वेषाला तोंड फोडण्याजोगी सुंदर सबब शोधून काढण्याइतकी बुद्धीच तीव्र नव्हती! बेकीची एकी व्हायला तर कारणसुद्धां लागत नसें, याचंच आश्चर्य वाटतं! थोडीशी समजावणी—एकादा दुसरा शब्द अगर एकदा अश्रु यांनी काम भागे, तर एकादे वेळीं जालिम आणि विषारी वाक्बाणानंतर थोडयाशा स्तब्धतेनंतर हंसें-मुके आणि आलिंगनं यांनीं शेवट होत असे, नुसत्या आठवणनिं सुद्धां शिसारी येतें आहे.

— १३ —

या ठिकाणी दोन वाटसरुं आमच्या डब्यांत चढले आणि जरा लांबच्याच जागेवर बसले. त्या जागेवर बसेपर्यंत भाऊसाहेब सुमंतांनी आपलं बोलणं थाबवलें. त्याना जागा मिळून त्याच्या हालचालीचा आवाज बंद झाला आणि त्यानीं पुन्हा बोलण्यास सुरवात केली. अर्थात विचाराची सुसंबद्धता कायम होती. "या सगळयात जुलूम जर कोठें असेल, तर मुळात स्वर्गीय, • अद्वितीय असं ज्या प्रेमाचं-वर्णन आहे पण व्यवहारात उल्लेख किंवा विचार सुद्धा तिरस्करणीय-अगदी ओकारी येईल असं यांत आहे. निसर्गानं काही तरी बिनहिशेबी केलेलं नाही. हा जर जुलूम वाटतो तर आडपडदा सोडून तसं सांगितलं पाहिजे. याऐवजी लोक मात्र 'हे अलौकिक स्वर्गीय' असं कर्माशेसारखं शिक्षण देत आहेत."

"आमच्यात एवढं अजातशत्रुत्व उत्पन्न होण्यास कारण तरी काय?" मी आश्चर्यचकित होऊन विचार करुं लागलो. "पण याचा उगम मात्र अगदी स्पष्ट आहे. आमच्यात पूरेपूर भरलेला मनुष्य स्वभावांतला विरोध हेंच शत्रुत्वाचं कारण,-आमच्या शत्रुत्वाची ही देवाण घेवाण पाहिली की, मला आश्चर्य वाटे. आणि आम्हाला एकमेकांना एकमेकाबद्दल द्वेषाशिवाय दुसरं कांहीं वाटणंच शक्य नव्हतं. गुन्ह्यांस प्रोत्साहन देणाऱ्या भागीदाराबद्दल जी भावना वाटते तीच भावनेचा प्रकार आपल्या एकमेकांच्या भावनेंत होता."

मी मुद्दा सोडून बोलतो असं कां तुम्हाला वाटतयं? बिलकूल नाही. मी माझ्या बायकोचा कसा खून केला हेंच मी स्पष्ट करणार आहे. चौकशीच्या वेळी मी तिला केव्हा व कशी मारली असं त्यानी विचारलं. मूर्ख लेकाचे! त्यांची समजूत मी ६ ऑक्टोबरला चाकूनं तिचा खून केला, त्यावेळी नव्हे पण पूर्वीच—आज प्रत्येकजण—आपल्या बायकोचा जसा खून करीत आहे तसा प्रत्येक जण सगळे—त्यातला एकूण एक.''

''हे कसं?'' मी विचारलें.

''जी इतकी स्पष्ट व पुराव्यानं सिद्ध झालेली गोष्ट तिकडं लोकाचं लक्ष कसं जात नाही हेंच आश्चर्य आहे! जी गोष्ट डॉक्टराना समजली पाहिजे आणि त्याबद्दल त्यांनी आग्रह धरला पाहिजे ते हट्टीपणान मुसक्या बाधून बसतात, तिकडं लोकाचा कानाडोळा कसा हें अघटीत वाटतं!''

''गोष्ट अगदी उघड आहे. जगात जितक्या बायका आहेत, तितकेच साधारणपणे पुरुष आहेत. यावरून निष्कर्ष अगदी स्पष्ट आहे. खालच्या दर्जाच्या जनावराना हे कळतं त्याप्रमाणें ते वागतात, माणसांना हा निष्कर्ष काढावयाला अलौकिक बुद्धिमत्ता नको. निष्कर्ष इतकाच की, संयमाशिवाय भागणार नाहीं. हा शोध सोपा असेल पण अजूनही माणसाला तो उमगलेला नाहीं. शास्त्रज्ञांनीं रक्तांत मायक्रॉस्कोपखालीं दिसणाऱ्या नवीन जंतूंचा शोध लावला—शेकडों गाढवपणाचे शोध लावले असतील—पण हें सत्य शोधून

काढण्याइतकं याचं शास्त्र पुढं गेलेलं नाही! निदान शास्त्रज्ञानी असं एखादं तत्व जगापुढं मांडल्याचं कोणाच्या ऐकिवात नाहीं."

"अडचणींतून बाहेर पडण्यास स्त्रियांच्या पुढे दोनच मार्ग राहतात. परिस्थितीनुरुप आपला गर्भाशय काढणं, अगर गर्भपात करणं हा एक मार्ग झाला. दुसरा मार्ग हा अडचणीतून सुटण्याचा मार्ग असं म्हणताच येणार नाही. सृष्टिक्रमाच्या कायद्याचं मुद्दाम उल्लंघन इतकंच त्याला म्हणता येईल. एकाच वेळी मुलाची माता आणि नवऱ्याची पत्नी या दोन जबाबदाऱ्या तिच्यावर पडतात."

"आपल्या वंशवृद्धीची वेल वाढवणाऱ्या आपल्या चिमुकल्या मुखत्याराला, पोटात बाळगतांना, पाजताना, वाढवताना, काय चमत्कार होत असतील, किती, उच्च व महत्त्वाच्या गोष्टी घडत असतील, हे जाणण्यास विचारशक्तीस फार ताण द्यावा लागणार नाही. आणि ह्या पवित्र कृत्यांत अडथळा आणला जातो—कशा करता? अशी परिस्थिती असताना स्त्रियांच्या हक्काबद्दल आणि स्वातंत्र्याबद्दल यांनीं गाढवासारखं बरळत सुटायचं. नरमांसभक्षकांनीं सुद्धां लढाईत पकडलेल्या गुलामाबद्दल स्वतःच्या पोटाकरता त्याना अन्न देऊन पुष्ट करीत असताना त्याच्या हक्कांबद्दल व स्वातंत्र्याबद्दल आग्रह धरला अशी घमेंड मारावी."

हें मी नवीनच ऐकत होतो. माझ्यावर याचा बराच परिणाम झाला.

पुरुषाची स्त्रियाबद्दल जी कल्पना असेल त्यास अनुसरूनच त्याचा शिक्षणक्रम पुढेंहि ठरवला जाणार आहे. स्त्रियाच्या-बद्दल पुरुषांच्या काय अपेक्षा व मतं आहेत त्याकडे कोणीहि आता दुर्लक्ष करीत नाहीं. ' खाना, पिना, और मजा लेना ' असं कवी म्हणतो. आरंभापासून सर्व देशाचे ग्रंथ पालथे घाला, चित्रकला व शिल्पकला याचं निरीक्षण करा—अगदी शृंगारास आरंभ झाल्यापासून पहा—तुम्हाला हेंच दिसेल की, समाजांतील वरिष्ठ अगर कनिष्ठ लोकात एकच ग्रह कीं, ' स्त्रिया म्हणजे सुखोपभोगाचे साधन. '

" पण एवढ्यानंच भागलं नाहीं. नीचपणा असा आहे की, स्त्रियाचा असा कमीपणा तर करायचा, पण या परिस्थि-तीवर व्यवस्थित पांघरूण घालायचं—पूर्वीच्या काळीं—स्त्रियाकरता शूर सरदार प्राण अर्पण करीत असत—त्याना देवता समजत असत. हल्ली स्त्रियाच्याबद्दल आदर आहे व आपण त्याना मान देतो, त्याबद्दल त्याना अभिमान वाटतो. त्याच्याकरता स्वतःच्या जागा खाली करतील. त्याचे हातरुमाल उचलून देतील.—राज्यकारभार, कोणत्याहि मुलकी जागा त्याना द्याव्यात असं हल्ली म्हणतात, तर राज्यकारभार हाकण्यात त्यानीहि हातभार लावावा असं काही कबूल करतात. याप्रमाणं त्याच्या अधि-काराबद्दल, समाजातील स्थानाबद्दल, जगाचं मत असूनसुद्धा स्त्रियाचं कार्य व दर्जा बदललेला नाहीं. पूर्वीप्रमाणेच त्या आज एक सुखोपभोगाचें साधन नाहीत काय ?

" याचप्रमाणें परिस्थिति—असेच अडथळे—आपल्या गुला-माच्या व्यापारात व कृत्यांत आढळतात. पारतंत्र्यामुळें नाखुषीनें

केलेल्या बऱ्याच लोकांच्या श्रमाचा मोबदला थोड्यांना मिळणें म्हणजेच गुलामी व्यापार! जर गुलाम नाहींसे व्हावें असें वाटत असेल, तर लोकांनीं इतर लोकांच्या श्रमाच्या मोबदल्याची आशा सोडली पाहिजे—इतकेंच नव्हे, तर असा मोबदला पचविण्याची त्याना लाज वाटली पाहिजे, पाप वाटलं पाहिजे. पण हे नुसती वरवर सुधारणाच करतील. गुलामांचीं कायदेशीर खरेदी—विक्री करतां येणार नाही, अशी व्यवस्था करतील—व येवढं केलं कीं, जगांत आता गुलाम नाहींत अशा भ्रमात राहतलि. दुसऱ्यांच्या श्रमाचा मोबदला उपटणं यात जोंपर्यंत पाप वाटत नाही-उलट आनंद वाटतो, तोंपर्यंत गुलाम ही जात राहाणारच—इकडं यांचं लक्ष जात नाही—आणि असा फायदा घेणं यात वावगं अगर बेकायदेशीर, असं आहे असं जोंपर्यंत समजत नाहांत, तोंपर्यंत हें त्याचें विचार कृतींत आणण्याइतके बलवान व लुच्च्या माणसाचाही तोटा नाहीं.

"स्त्रियाच्या पारतंत्र्याची हीच कहाणी आहे. स्त्रियांना सुखोपभोगाचे साधन समजणं व तें हस्तगत करण्याचा प्रयत्न करणं यात वावगं काही नाही असं मत आहे आणि स्त्रियाची परिस्थिति या वस्तुस्थितीवरच आधारलेली आहे. स्त्रियाना मतदानाचे हक्क दिलेत—पुरुषाच्या बरोबरीनं अधिकार दिलेत तरी त्यांच्याकडे 'सुखोपभोगाचें साधन' म्हणूनच लोक पहात राहातात. त्यांनाही अनुरूपच शिक्षण देतात, प्रथम लहानपणीं हेंच तिच्या मनावर बिंबवायचं, मोठेपणीं लोकमतानं हेच तिला पटवायचं. अशारितीनं पूर्वीप्रमाणेंच आतांही स्त्री कनिष्ठ व

अनीतिमान राहते व पुरूष पूर्वीप्रमाणेंच 'जुलमाचा मालक' राहतो. सर्व ठिकाणीं त्याना स्वातंत्र्य देऊनसुद्धां त्यांच्यांकडे पाहण्याच्या दृष्टींत फरक नाहीं, तोंपर्यंत असेंच चालायचें.

"शाळा कॉलेजातील सक्तीच्या शारीरिक शिक्षणामुळें काहीच फरक होणार नाहीं, तर पुरुषानी स्त्रियाबद्दलचं मत व स्त्रियांनीं स्वतःबद्दलचं मत बदललं तरच फरक होईल. या परिस्थितीचा खुबीनं बदल करावयाचा असेल तर, कौमार्य म्हणजे स्त्रियाना स्वतःचा अमोलिक ठेवा वाटला पाहिजे—हल्लीं कुमारिका राहायचं म्हणजेच लाज वाटते—अपमान वाटतो. अशी विचारक्रांती होईपर्यंत मात्र मुलीचं ध्येय ती कितीहि शिकलेली असो—हेंच राहाणार कीं, जास्तींत जास्त माणसाना आपणाकडे खेचायचं! हल्लीं हेंच चालू आहे हेतु इतकाच कीं, पसंतीला जास्त संधी! याच विचारसरणींत मुलगी कितीहि शिकलेली असो, अगर अतिशय कलानिपुण असो, रतिभरसुद्धा फरक पुरुष करणार नाहींत! एक माणूस जाळ्यात सापडला की, स्त्रीला सुख वाटतं—हेतु पूर्ण झाल्याचं समाधान वाटतं, म्हणूनच जन्मभर हीच कला अवगत करण्याचं त्यांचं ध्येय असतं पूर्वीपासून हें चाललं आहे, आणि असंच चालत राहणार. आपल्या समाजांतील मुलींत ही वृत्ती स्पष्ट नजरेस पडते, आणि लग्नानंतरही त्यांची ही वृत्ति कायम राहते. या वृत्तीमुळे निवडीला मुलीपुढं बरेच नमुने मिळतात, तर सौभाग्यवतीला नवऱ्यावर वर्चस्वाची मगरमिठी वाढवावयाला उपयोग होतो. बाळंतपणानें फक्त ही वृत्ति थोडी

दबते किंवा शेवट होतो, आणि हेंसुद्धा ती स्त्री स्वतःच्या मुलाची स्वतः जोपासना करत असेल तर, पण यातसुद्धा डॉक्टरची लुडबूड आहेच!

"मला पाच मुलं झाली, त्याची जोपासना बायकोनं स्वतःच केली; पण पहिल्या बाळंतपणात ती आजारी पडली. शिष्ट डॉक्टरनी तिला बेपर्वाईने यान्त्रिक पद्धतीने—चाचपून तपासले. आणि निकाल दिला कीं—अंगावरचं पाजणं बंद केलं पाहिजे. माझे पैसे खर्च झाले ते झालेच, पण याशिवाय डॉक्टरचें आभार मानावें लागले. याचा परिणाम इतकाच झाला कीं, पुरुषाना भुलविण्याऱ्या नादातून सुटण्याचा राजमार्गही तिला नाहींसा झाला. आम्ही एक दाई पाजण्याकरता ठेवली—म्हणजेच एका स्त्रीला—तिच्या दारिद्र्याचा, दुःखाचा व अज्ञानाचा फायदा घेऊन, भुलवून, तिच्या मुलापासून तोडलं, आणि पांढरं पातळ नेसायला देऊन तिला नर्सची शोभा आणली मुलाची जोपासना व आईचं कर्तव्य, यातून अशा रीतीनं सुटका झाल्याबरोबर पुन्हा नखरेल मोहजाळ पसरण्याकडे तिची वृत्ति जागृत झाली. मत्सराच्या तीव्र वेदना बोचू लागल्या. संबंध आयुष्यांत क्षणभरही शांतता मला मिळाली नाही. माझे एकट्याचेंच मी सांगत नाही—माझ्या परिस्थितीत असलेल्या प्रत्येक नवऱ्याची मत्सराच्या वेदनानी असह्य होऊन हीच गत झाली असती!

## — १५ —

"वेड लावणाऱ्या या मत्सराच्या दुःखातून सबंध आयुष्यांत क्षणभरहि शांतता मिळाली नाहीं. कांहीं वेळीं या वेदना

अतिशय तीव्र होत असत. आणि डॉक्टरांनी बायकोला अंगावर पाजण्याची बंदी केली ती वेळही अशीच होती.

"हा मत्सर तीव्रतर व्हायला कारणं होती. किती सहज तिनं आपली मातृत्त्वाची जबाबदारी—मुलाला पाजण्याची—टाळली! मी असा विचार केला की, जर संधी मिळाली तर आपलं पत्नीचं कर्तव्यसुद्धा पायाखाली तुडवेल. तिची प्रकृति सुदृढ होती आणि डॉक्टरच्या बंदीविरुद्ध तिनं यापुढें सर्व मुलं स्वतःच पाजली. काहीसुद्धा तिला अडचण भासली नाहीं."

"तुम्हास डॉक्टरची काही विशेष आवड दिसत नाही." डॉक्टर व त्याच्या धंद्याबद्दल बोलताना त्याच्या आवाजांतील कठोरपणा पाहून मी विचारलें.

"तो आवडी-निवडीचा प्रश्न नाहीं." त्यानें उत्तर दिलं. "माझ्या आयुष्याचा सत्यानाश डॉक्टरनी केला—आता हजारो—नव्हे लाखो—लोकांच्या आयुष्याचा नाश त्यानीं केला आहे, अजून करीत आहेत. आणि या परिणामाची कार्यमीमांसा लावल्यावाचून मला राहवत नाहीं! इतर धंद्यातील लोकाप्रमाणं त्यानी पैसा मिळविण्याकरता झटावं हें साहजिक आहे. जर ते दुसऱ्याच्या संसारात लुडबूड करण्याचं थांबवून—निराळे राहतील व आम्हाला शांतता भोगू देतील, तर मी माझं निम्म उत्पन्न त्याना खुषीनं देण्यास कबूल होईन, मी आकडेवारी गोळा केली नाहीं, पण पाचपन्नास अशी उदाहरणं—अशीच इतर असंख्य आहेत—माझ्या माहितीत आहेत कीं, ऑपरेशनच्या नांवाखाली डॉक्टरनी बाळंतपणात आईचा तरी मुडदा पाडलाय,

नाहींतर जन्माला येणाऱ्या मुलाचा तरी खून केलाय. पण न्यायालयानें केलेले खून आणि यानीं केलेले खून यांना कोणी खून समजत नाही! कारण मानव जातीच्या हिताकरिता हे खून केले जातायत ना! वैद्यक–शास्त्रानीं केलेले गुन्हे नुसते मोजणंसुद्धा अशक्य आहे. सर्व गुन्हे एका पारड्यात व स्त्रियांच्या माध्यमानें त्यांनी वास्तववाद किती गढूळ केलाय–आपली नीति किती हीन केली–याचा विचार केला तर गुन्ह्याचं पारडं पार वर जाईल. त्यांनी दिलेल्या सर्व सूचना तुम्ही अंमलात आणण्याचं ठरवलं तर माणसं जवळ जवळ येण्याऐवजी एकमेकापासून दूरदूर राहावं लागेल. डॉक्टराचे हुकूम जर प्रामाणिकपणानं पाळले, तर प्रत्येकजण इतरापासून बहिष्कृत–नुसता चमचा उचलायचा तर प्रत्येक वेळी प्रथम हात कॅरबॉलिक ॲसिडमध्ये बुचकळावा लागेल. त्याचं खरं विषारी अस्तित्त्व पुरुषाना अनीतिमान बनविण्यात दिसतं–स्त्रियांच्या बाबतीत तर हे स्पष्ट दिसतं."

"एखाद्यास तूं वाईट वागतोस, नियमित वागत नाहीस, तरी चांगला वाग; असं म्हणणं हे व्यवहाराला सोडून होईल. असं दुसऱ्यालाच काय, पण स्वतःला म्हणण्याचंसुद्धा मनात कोणी आणणार नाही. तुमची वागणूक अनीतिमान असली, तर त्याचं कारण तुमच्या मज्जातंतूच्या बिघाडात सापडणार. अशा वेळी तुम्ही डॉक्टरचा सल्ला घेतला पाहिजे. तो दहाबारा आणे किंमतीचं औषध तुमच्या पदरांत बांधणार–तुमची प्रकृती पुन्हां जास्तच खालावणार–कीं पुन्हां डॉक्टर अन् पुन्हां औषधं, असं विचित्र रहाटगाडगं आहे हें!"

"हे जरा विषयांतर झालं. मला सांगायचंय ते हें की, माझ्या बायकोनी सर्व मुलांची स्वत: जोपासना केली. अगदी व्यवस्थित आहेत सर्व मुलं. आता गरोदरपण आणि मुलांचें संगोपन, या दिवसातच मात्र माझ्या मत्सरी स्वभावापासून मला त्रास होत नसे. जर ही मुलंबाळं झाली नसती, तर माझा शेवट लवकरच झाला असता. खरोखर, मुलांनीच तिचं आणि माझं रक्षण केलं. आठ वर्षांत पाच मुलं झाली. त्याचं संगोपन तिनंच केलं."

"आता तुमची मुलं कोठे आहेत." मी विचारले.

"मुलं!" घाबरट आवाजात तो बोलला.

"माफ करा हं!" चुकून तर मी दुखःकारक आठवण काढली नाहीं!

"नाही! तसं काही नाही! तिच्या भावाकडे व माझ्या मेव्हणीकडं हल्ली मुलं आहेत. माझी सर्व इस्टेट मी त्यांना दिली; पण मुलं माझ्याजवळ ठेवण्यास त्यांनी नकार दिला. एका दृष्टीने मी वेडाच आहे. मी आतां त्याचेपासून दूर जात आहे. मी मुलाना भेटलों; पण माझ्या ताब्यात मुलं ठेवण्यास ते कबूल नाहींत. माझ्याकडं मुलं असती तर आईबापाचा कित्ता त्यांनीं गिरवू नये, असं मी त्याना शिकवलं असतं, आणि बरोबर हेच तेवढं त्यांना नको होतं. आपणासारखंच त्यांनीं व्हावं, अशी त्यांची इच्छा आहे. आता ह्याला काहीं इलाज नाहीं. माझ्यावर विश्वास न ठेवता मुलं स्वतःजवळ ठेवणं ह्यांत त्यांचं गैर कांहीच नाहीं. त्याना शिकविण्याइतकी शक्तीही

आता माझ्यांत नाही, असंच मला वाटतं. माझा सर्वस्वी नाश झालेला--पागळा माणूस मी—पण लोकांना लवकर समजणार नाही, ते मात्र मला माहित आहे. हें खरं आहे—सर्व मुलं अगदी खुशाल आहेत, आणि सभोंवतालच्या लोकाप्रमाणें असभ्य व निर्दय होत आहेत. मी त्याना तीनदा भेटलों. त्याच्याकरिता मला काही काहीसुद्धा करता येत नाही. अंबा-पुरला माझा छोटासा बंगला व शेती आहे. तिकडं चाललों आहे. मला जे समजून आलं तें काकाना समजायला फार अवधी लागणार आहे. सूर्यांत तेज किती अगर चंद्रलोकांवर वस्ती आहे का नाहीं याचा शोध सोपा आहे; पण आम्ही अनीतिमान ठरलो याचा शोध कठीण—अत्यंत कठीण आहे ! तुमचे माझ्यावर उपकार आहेत कीं, हें तुम्ही सर्व मन लावून ऐकत आहात ! ”

## — १६ —

“ आता तुम्ही मुलाचें नाव घेतलेंत ना, त्यातसुद्धा कसा खोटेपणा शिरलाय याचा विचार करा ! मुलं म्हणजे परमेश्वरी देणगी ! झाडावरचं फूल आणि रांगतं मूल ! खरा आनंद ! हें अगदी खोटं आहे, पूर्वी हे खरं असेल कदाचित् ! हल्लीच्या ह्या बोलण्यात सत्याचा अंशसुद्धां उरलेला नाही. मुलं म्हणजे दु:खाचं मूळ—दुसरं काहीं नाहीं. हल्लीं बहुतेक आयाना असंच वाटतं; आणि केव्हां केव्हां नकळत त्या स्पष्ट बोलूनहि टाकतात. आपल्या समाजांतील कोणत्याहि पोक्त स्त्रीला अगर सुखवस्तू

माणसाला प्रश्न टाका की लगेच ते सांगतील की मुलं होऊन, आजारी पडून जाण्यापेक्षा न झालेली बरी–! या उप्पर मुलं झालीच तर त्याची जोपासना ते स्वतः करणार नाहीत; कारण, त्यामुळे माया वाढेल आणि शेवटी दुःख फार होईल. लहान मुलांच्या बाळ-लीला, त्याचे गोडस हात, छोटे पाय, बाळसेदार शरीर याच कौतुक याना वाटत नाही. उलट मुलाच काहीं बरं–वाईट झाल तर गोष्ट सोडा. पण त्याला आजार अगर मृत्यु येऊं शकेल, या अंधुक भितीनंच याचं डोकं उठतय! मुलं आणि त्यापासून मिळणारा आनंद, अन् मुलं आणि क्वचित् त्याबाबत निराशा, अशा रितीने सर्व सागोपाग विचार करुन ते आपल्याला मुलंच होऊं नये असं ठरवतात. आणि मुलाच्या प्रेमामुळेच हे विचार आहेत असं ते न भिता–अकृत्रिमतेनं–सागतात. काय, अभिमानास्पद भावना आहेत नाही? याना हें कळत नाहीं की, या विचारसरणीत बोलताना प्रेमाबद्दल अभिमान दिसत नाहीं, तर स्वतःच्या स्वार्थाचं प्रदर्शन होतं. मुलाबद्दलच्या भितीनं यांना पूर्ण सुख मिळत नाही. स्वतःला प्रिय असणाऱ्या व्यक्तीकरता स्वतः त्याग करायला हे तयार नाहीत; उलट नुकत्याच जन्माला येऊ शकणाऱ्या अर्भकाचाच याचे स्वतःकरतां नाश करतात. याला कोणीच प्रेम म्हणणार नाहीत. उलट यात फक्त स्वार्थ आहे!

"आणि या त्यांच्या स्वार्थाबद्दल आपल्या समाजातील सुखवस्तू कुटुंबांतील बायकांचे कान उपटण्याचंही धैर्य कोणांत नाही. उलट ह्या विव्दान डॉक्टरच्या लुडबुडीमुळं, मुलांच्या

प्रकृतीच्या काळजीमुळं, त्याना किती दुःख सोसावं लागतं हें लक्षांत आलं की, त्या बायांना तरी काय दोष द्यावा असं वाटतं! डॉक्टराची आमच्या आयुष्यात किती भयंकर घडामोड आहे. तीन-चार मुलं झालेली—सारखी त्याच्या जोपासनेंत दंग—पहिली वर्ष माझ्या बायकोनी किती काळजीत काढली. याची कल्पना आली की, अंगावर काटा उभा राहतो. नुसतं कुत्र्याचं जिणं होतं. त्याला 'आयुष्य' हें नावच बरोबर नाही संकटाची आपली लोबती तरवार मानेवर! जरा कुठं त्यातून सुटतोय—तो पुन्हा सुरवात—पुन्हा त्यातून सुटका असं सारखं चाललंय. रहाट गाड्गंच म्हणा ना! पाणी भरणं रिकामं होण्याकरता आणि रिकाम होणं पाण्याला जागा करण्याकरता. गळती लागलेल्या होडीतल्या उतारुसारखी आमची स्थिति होती. कित्येक वेळा ही जोपासना—ही पोरांबद्दलची कळकळ आणि काळजी—हे तिचं ढोंग आहे, असं माझ्या मनात येई! आमच्या मतभेदात न्यायाचा काटा आपल्या बाजूस झुकविण्यास हें अमोघ अस्त्र बरं आहे, अशा करतां हें सोंग आहे, असा मी तर्क करीत असे! तिचं बोलणं, वागणं, पूर्वीच ठरविलेल्या बेतानुरुप चाललंय, अशी शंका येई; पण हें खरं नव्हे हं! तिची मुलाची जोपासना, शुश्रुषा, त्यांच्याकरिता झटताना दिसणारी तळमळ, तिला पडणारे कष्ट व त्यामुळे होणारा त्रास पाहिला म्हणजे आम्ही दोघंही हें एक पितृकर्तव्य व अतिदिव्य करतों आहोंत असं वाटे! बहुतेक बाबतीत दिसून येणारी मुलांबद्दलची आसक्ति आणि प्रेम तिच्यांत होतं.

आणि मुलाच्या कौतुकात, जोपासनेत व व्यवस्थेत गुरफटून जनावराप्रमाण राबण हे तिला कर्तव्यच वाटत असे! पण, तर्कबुद्धि व दुरदर्शीपणा यामुळं तिला मनःस्वास्थ मात्र मिळत नव्हतं. ‘ अतिस्नेह पापशंकी ’ या न्यायाने सारखे कुतर्क तिला भेडसावीत असत. कोंबडीला आपल्या पिलाना काय आजार होईल अगर केव्हा कशी काळाची झडप येईल, याची कल्पनाही नसते व त्यामुळं भीतीही नसते. रोगापासून अगर मृत्यूपासून आपल्याला मुलाचं रक्षण कसं करावं याचं ज्ञान आहे अशी माणसाना घमेंड आहे, तशी कोंबडीला नसल्यामुळं तिला मुलं त्रासदायक अगर भीतिप्रद वाटत नाहीत. तिच्या आवाक्यात असलेलें नैसर्गिक लालनपालन ती करते. त्यात तिला आनंद वाटतो व दुर्दैवानं एखादं पिल्लू आजारी पडलं, तर त्याबद्दल तिचं कर्तव्य अगदी ठरल्यासारखं आहे. त्याच्या पोटाला घालणं, त्याला आपल्या पंखाखाली घेणं, इतकं केलं की, आपलं कर्तव्य झालं, असं ती समजते. इतकी काळजी घेऊनही ते दगावलं तर त्याचं काय झालं, ह्याचा ती विचार करीत बसत नाही. जरा वेळ त्या पिलाभोवती चक्‌चक् करीत, पुन्हां विसरेल नि पूर्ववत् आपल्या उद्योगात निमग्न होईल.

“ पण आपल्यात व विशेषतः माझ्या बायकोत अशी गोष्ट नाही. मुलाचे आजारीपण आणि त्यांची शुश्रुषा येवढयाबद्दलच आमची चर्चा चालायची असं नाही. तर त्याना शिक्षण कसं द्यावं, त्याच्या मनाची वाढ कशी करावी. याबद्दलही गोष्टी निघत. याबाबत तिनं कुठंतरी वाचलेलं अगर ऐकलेलं असावचं आणि

ते म्हणजे, तिला अगदीं वेदवाक्य वाटायचं! बरं, या लिहिण्यांत व बोलण्यात तरी काहीं ताळतंत्र–बिलकूल नाही. त्याना अमूकच खायला द्यावं, तर तमूक देऊंच नये–तें असंच द्यावं आणि तसंच देऊं नये–कपडे कसे घालावे–आंघोळ कशी घालावी–झोपवावं कसं–तर फिरवावं कसं!–बाकी माझ्यापेक्षा तिचंच जास्त लक्ष असे, जणूं काही मुलं आजच जन्माला येत आहेत. त्याच्या जोपासनेंत व खाण्यापिण्यात आबाळ, व तेच त्याच्या आजाराचं कारण. अशी तिची समजूत व म्हणूनच स्वतः दोषी, असं ती समजत असे.

"मुलं चागली खेळती–बोलती–दणगट प्रकृतीची असताना मनाची ही परिस्थिति, तर ती आजारी पडल्यावर मग तर विचारावयालाच नको! स्वतःच्या जीवाला सारखी टोंचणी–निव्वळ नरकवासच म्हणाना! आपल्या मनाचा आपला सिद्धात ठरलेला–की रोग बरा होऊं शकतो. तो बरा करण्याचे एक शास्त्र आहे–ते जाणणारे लोक आहेत, आपण त्याना डॉक्टर असं म्हणायचं! प्रत्येक डॉक्टरच्या हाताला यश येईलच असं नाही, पण त्यांतल्या अगदी तज्ञापुरतांच आपण विचार करायचा. आता पोर आजारी पडलं कीं, ही संजीवनींचीं मात्रा देणारा डॉक्टर कसा मिळवायचा? मिळाला कीं पोर बचावलं! बरं, जरा दूर ठिकाणामुळं अगर अन्य कारणामुळं वेळेवर आणला नाहीं कीं पोर गमावलं! आतां ही माझ्याच बायकोची समजूत होती असं नाहीं, तर मध्यम वर्गातील सर्व स्त्रियांची हीच समजूत आहे. तिच्या कानावर नेहमीं काय

ती हीच बोलवी पडत. भामाबाईची तीन पोरं दगावली ! ”
‘ अहो, डॉ. गुणवंतरावना वेळेवर बोलावलंच नाहीं.’
‘ ठमाबाईच्या मोठ्या मुलींना त्यांनीच जीवदान दिलं ! डॉ. च्या सागण्याप्रमाणें ते आपले लोटकर–त्यानीं गाव सोडलं–अगदी बाहेर राहिलें, पण जीवे वाचले ! तेंच, गावातली मात्र पोरं दगावली.’ ‘ रंगूबाईची चिगी–अगदी पाण्याचं पितर, पण डॉक्टरच्या सागण्यावरून हवा बदलली–आणि पोरगी बचावली ! ’ अशा परिस्थितींत मुलावर निःस्सीम प्रेम असल्यामुळं माझ्या बायकोला वाटायचं कीं, हे जे धन्वंतरी डॉक्टर याच्या हातात पोरांचे जीव वाचवण्याचं आहे, आणि त्यांची ह्या बाबतींतलीं मतं कळली पाहिजेत; ह्या विचारातच ती बिचारी सारखी कुढत–सागत राहात असे. डॉक्टरची पक्की खात्री की, आपल्याला ह्यातलं कांही कळत नाहीं–आपण काहीं करूं शकत नाहीं, पण आपल्यावरील अंधश्रद्धा कायम राहावी म्हणून मग, छपवाछपवी आणि थातुरमातूर कांहींतरी करायचं डॉक्टरची ही स्थिति मग इतरांची गोष्टच नको !

“ प्रत्येक बाबतींत जनावरासारखी वृत्ति असती, तर तिला निदान दुःख तरी झालं नसतं. प्रत्येक बाबतींत माणसासारखी वृत्ति ठेवली असती, तर परमेश्वरावर श्रद्धा ठेवून कुणबी बायासारखं ‘ देवानं दिलं त्यानंच नेलं ’ असं बोलली असती. जीवन-सूत्र हें माणसाच्या हातात नसून परमेश्वराच्या हातांत आहे, हें तिला पटलं असतं. म्हणजे आपल्या पोराचं दुःखनिवारण आपल्या हातांत आहे, या विचारानं डोक्यांत काहूर उठलं नसतं; पण तिला काय माहित कीं,

'काळाची ही उडी पडेल बा जेव्हां ।
सोडविनां तेव्हां मायबाप ।
तुका म्हणे कोणा सोडविना कोणी ।
एका चक्रपाणी वाचोनिया. ॥

बाकी खरोखरीच तिची स्थितीच गुंतागुंतीची आणि बिकट होती. पदरात अशक्त, पाण्याच्या पितरासारखी पोरं—ज्वर, देवी, गोवर यासारखे रोग आ करून तयार—आणि हिचें तर त्याच्यावर निस्सीम प्रेम! बरं, जोपासना हिच्याकडे, तर जोपासना कशी करावी याची माहिती परक्यास माहिती आणि मदत घ्यायला जावी तर पैशाचा प्रश्न, आणि इतकंही करून मदत होईलच अशी खात्री नाही; मग स्वतः कष्टी होण्यापलीकडे तिच्या हातांत काय होतं!

" या तिच्या कुढण्यात मात्र कधींच खंड नव्हता. आमच्या भांडणाची तीव्रता कमी होऊन जरा कुठं रागाचा पारा उतरून काहींतरी काम हातात घेऊन आयुष्याला वळण लावावं म्हणतोय, तोच कुणाचं तरी दुखणं दत्त म्हणून पुढं आलंच! चिमीचं पोट फुगलंय, तर रामूला गोंवर दिसतोय! झालं! या क्षणापासून आमच्या पवित्र छळाला सुरवात. कुठल्या डॉक्टराकडं पळायचं, तर रामूला कोठल्या खोलींत डाबायचं! मग, इंजेक्शन काय आणि मिक्श्चरं काय—तापाचे तक्ते काय आणि डॉक्टरांची संमेलनं किती! हें जरा कुठं हातांत येतंय, तर दुसरं काहींतरी उपटायचं; कीं पुन्हां सुरवात. एकूण काय, सुखाचा संसार म्हणून कधीं—कधीं नाहींच! खऱ्या

काळजींतून खोट्या काळजींत तर खोट्या दुःखांतून खऱ्या दुःखांत, सारख्या कोलांट्या उड्या चालल्यांत. आणि हेंच आयुष्य बहुतेक कुटुंबात चालू आहे. आतां आमच्या संसारात हें दुःख जास्त स्पष्ट होतं इतकंच! माझी बायको श्रद्धाळू होती—तिचं पोरावर प्रेम होतं, पोरांमुळं सुखाचा संसार होण्या-ऐवजीं संसारांत वीषच पेरलं गेलं.

"पोरामुळं भांडणाला कारणसुद्धा चागलं मिळालं होतं. प्रत्येकाचं अमक्या पोरावर प्रेम ठरून गेलं होतं, एवढं निमित भांडणाला पुरं होतं. माझं मोठ्या मुलीवर प्रेम, तर तिचं धाकट्या मुलावर. मुलं जशी मोठी झाली आणि त्याचे स्वभाव दिसून येऊं लागले, तसं त्याच्या बाजवाही ठरून गेल्या. आम्हीही त्यांना एकमेकांच्या बाजूस ओढण्यास कसूर करीत नव्हतो! याचा बिचाऱ्यावर जोपासनेवर परिणाम झाला, पण आमच्या ह्या अनादि-अनंत युद्धात तो विचार अमच्या डोक्यांत आलाच नाही. पोरगी नेहमी माझ्या बाजूला तर पोरगा तिच्या बाजूला—आईच्याच वळणावर होता तो. मला त्याच्याबद्दल द्वेष वाटे!"

— १७ —

"याप्रमाणं आयुष्य ढकलत असतांना आमच्यांतला द्वेष वाढतच होता. आतां तर मतभेदामुळं तट पडण्याऐवजीं दोघा तल्या अटीतटींमुळेंच मतभेद होऊं लागले. तिचं मन कसंही असो, अगर कांहीही इच्छा असो; माझं त्याच्या उलट उत्तर

ठरलेलंच! अर्थात् तिची उत्तरं आणि माझ्याशीं वागणूक याला साजेशीच असे. लग्नानंतर चार वर्षांनीं आम्ही दोघंही मनांत उमगलों की, आता एकमेकांला समजून वागण्याची आशा नाहीं— आपआपसात मतैक्य होणं शक्य नाही'—आणि आम्ही तो प्रयत्नहि पण सोडून दिला. अगदी सरळ व्यवहारा॰ तसुद्धा आमचे मतभेद कायम! नुसतं मुलाचं उदाहरण तुम्हांला मी सांगितलेच. आतां माझीं मतं मला मोठी मोलाची होतीं. किंवा मी तीं सोडून दिलीं असतीं तर विशेष हानी झालीं असती असं नाही, पण तिची जर माझ्याविरुद्ध मतं आणि त्याला होकार देणं म्हणजे शरण जाणच की नाही? आणि बाकीं मी कशालाही संमति दिली असती, पण हा विचा रसुद्धां मला रुचत नव्हता. बायकोची माझ्या बाबतींत तीच वृत्ति. तिची खात्री कीं, प्रत्येक बाबतींत आपण बरोबर आहोंत, तर मी स्वतःला सर्वस्वी निर्दोष समजत होतो. शेवटी आमच्यात बोलणं बंद होत होतं नसत्या म्हणावर आलं. 'वाजले किती?' 'बाहेर कोण आलंय.' असल्या साध्या शद्बावर सर्व व्यवहार आले.

"अशा ठरलेल्या प्रश्नोत्तरापेक्षां एकादा उणा अधिक शद्ब—कीं भांडण पेटलंच! चहा पिताना, जेवताना, खेळताना केव्हाही चकमक आपली ठरलेलीच! गोष्टीचं महत्त्व असो वा नसो; खुट्ट झालं कीं भांडण भडकलंच! माझ्या पुरतंच म्हणाल, तर मीं तिच्या विषयीं मत्सरात नुसता धुमसत होतो. ती चहा पीत असो, किंवा वीणत बसलेली असो, तिची प्रत्येक वागणूक

मला तिरस्कारणीय वाटे! तिनं नुसतं खुर्चीवर रेलून मोकळया अंगानं आळस दिला तरी मला हें कृत्य संतापदायक होई! ही द्वेषाची वृत्ती अगदी नियमीतपणे पद्धतशीर व वेळच्या वेळीं पुन्हा ह्रदयात येई, व त्याला आपण प्रेम म्हणतो, त्याच्याशी याचा लागाबाधा होता; पण हे मी बोललो नाही!

'पण ह्या दोहोत अगदी एकसूत्रता होती. प्रेमाचा काल संपला, की द्वेषाची सुरवात. त्याची तीव्रतासुद्धा अगदी परस्परावलंबी असे. तीव्र प्रेमाचा झपाटा, कीं द्वेषाचा काळ लांबलाच, आणि द्वेषाचा काळ अल्पजीवी ठरला की, मिळमित प्रेमाचं प्रदर्शन आलंच! प्रेम आणि द्वेष ही एकाच भावनेची दोन परस्पर विरोधी टोकं आहेत, हे आम्हाला त्यावेळीं समजलं नव्हतं.

'आम्हाला परिस्थितीची जाणीव व अर्थ जर समजता तर एकंदर जगणंच भयंकर झालं असतं; पण आम्हाला हें कळलंच नाही. आणि आनियमित आयुष्याच्या प्रत्येक माणसात—शाती आणि शिक्षा ही यातच आहेत. परिस्थितच्या दुःखाकडे एक प्रकारच्या धुक्यातून पाहण्याची संवयच लागते. आम्ही दोघेंही असंच वागत होतो. घरची व्यवस्था, मुलाची जोपासना, त्याची शाळा, स्वतःचे कपडे, खोलीतलं फार्निचर, तर दाराचें पडदे, वगैरे गरजेच्या बाबींकडे मन गुंतवून ती परिस्थितीचा भयंकरपणा विसरण्याचा प्रयत्न करी. मलाही दररोजचं काम, पत्ते किंवा गंजीफा माझ्या मनास गूंग करण्यास पुरेशा होत्या. याप्रमाणें प्रत्येकजण आपला सारखा गुंतलेला अणि

दोघांची खात्री की, जितक्या या इतर बाबींचा व्यासंग जास्त, तितका आपला खुनस आणि हाडवैर वाढीला उपयोगे जास्त आहे.

" तुला तुझ्या माकडचेष्टा ठीक आहेत, मी तिला म्हणत असे. तुझ्या कालच्या नाटकानं माझं डोकं उठलं आणि आज तर मला सभेला जायचंय.' हो तुम्हाला जीवाला लावून घेण्याचं कांही कारण नाही.' नुसता विचार करूनच ती राहत नसे. तर चागला तोंडानं ठणाऽणा करीत असे' तुम्हाला काय; पण कारस्थानं रात्रभर डोळयाला डोळा लागूं दिला असेल तर शपथ!"

" मनाची विकृति हिप्नॉटिझम, हिस्टेरिक्स वगैरे नवीन भपकेदार शास्त्रार्थ हा शुद्ध गाढवपणा आहे. इतकेंच नव्हे, तर तो दुष्ट व विषारी गाढवपणा आहे. आता डॉक्टरनी माझ्या बायकोला हिस्टेरीया व मला अनैसर्गिक आक्षेप म्हणून निकालात काढलं असतं कदाचित! अनुपान औषधसुद्धा सुरूं केलं असतं; पण आम्हाला सुधारण्यासारखं काहीं नव्हतंच!

"याप्रमाणं खरोखरी परिस्थितीची जाणीव नसताना निव्वळ भ्रमांत आम्ही राहात होतो आणि जर तो प्रसंग घडला नसता, तर मीहि माझं आयुष्य चागलं गेलं—निदान वाईट तरी नाहीच—अशा मनोरंगात बुड्ढा झालो असतो. मला एकमेकामधील दुःखाच्या दरीची आणि किळसवाण्या असत्याची कल्पना न येतां, उगीच हताशपणें आयुष्याशीं झुंज देत राहिलो असतो. आम्ही एकमेकांच्या आयुष्यांत वीष कालवलं,

आणि सारखं एकमेकांना फसवित डोळ्यात धूळ फेकीत राहिलो—डोळ्यावर कातडं ओढत राहिलों. याचप्रमाणं नरकवासात शेकडा नव्याण्णव कुटुंब पिचतायत याची मला तेव्हा कल्पनाहि नव्हती! मी नरकात कुजतोय याची मला त्यावेळी कल्पना नव्हती, आणि साहजिकच इतर बाबीचा मी कधीं विचारच त्यावेळीं केला नाही.

" सामान्यप्रतीच्या आयुष्यात आणि अव्यवस्थित आयुष्य यात किती भयंकर साम्य आहे हैं पाहिलं कीं आश्चर्य वाटतं! याप्रमाणं मातापितरानी एकमेकाचं आयुष्य असह्य केलं की— त्याचवेळी पोरांच्या दृष्टीनें शिक्षणाकरता सोय म्हणून शहरांत येणं भाग पडतं" नंतर तो स्तब्ध बसला. मला हुंदका आल्यासारखं वाटलं. स्टेशनही जवळच आलं होतं.

" किती वाजले ? " त्यानें विचारलं.

" दोन."

" काय थकलात वाटतं. त्यानं मला विचारलं.

" मी नाही, पण तुम्ही मात्र थकलेले दिसता. घशाला कोरड पडली वाटते. जरा स्टेशनवर पाणी पिऊन येतों." प्लॅटफॉर्मवर उतरताच तो बोलला.

मी एकटाच बसून त्याच्या बोलण्याच्या विचारांत इतका गर्क झालों होतो कीं, तो पुन्हा येऊन बसलेला मला कळलं सुद्धा नाही

— १८ —

" मी वारंवार मुद्दा सोडून बाजूला जात आहे, पण याबद्दल फार वेळ विचार केल्यामुळं प्रत्येक गोष्टीकडे पाहण्याचा माझा दृष्टिकोन बदलला आहे आणि म्हणून सर्व तपशीलवार सांगणं भाग आहे.

" याप्रमाणे आम्ही शहरात राहण्यास आलों. दुःखी लोकाना सुखाचा निःश्वास सोडायला शहरात खेड्यातल्यापेक्षां जास्त अवसर असतो. स्वतःच्या निर्जीव, गंजलेल्या आयुष्यक्रमाचा विचारसुद्धा न येता तो शहरात वाटेल तितके दिवस कंठू शकेल. स्वतःचा विचार करायला फुरसतच कोठे आहे? सारखा गुंतलेला, घाण्याचा बैलच जसा! सामाजिक गोष्टीत पोराची, स्वतःची–प्रकृतीची काळजी, त्याचं शिक्षण, कलेची प्रदर्शनं, लोकाच्या भेटी–त्याची परतभेट–सारखी धुमाळ लागली आहे. भेट घेणं कर्तव्य आहे असं एकादं–दुसरं तरी धेंड हटकून शहरात हजर आहेच. स्वतःच्या प्रकृतीची तक्रार दुरुस्त करून घेतलीच पाहिजे. पोराचं औषध पाणी आहे. शाळेच्या प्रगति पुस्तकावर शाळेत चौकशी केली पाहिजे. एक ना दोन हजार गोष्टी–आयुष्य म्हणजे नुसता भ्रमाचा भोपळा आहे.

" परस्पराच्या सहवासाच्या दुःखाचा एकमेकाना संसर्ग न देता याप्रमाणें आम्हीं राहात होतों, शिवाय, घराची व्यवस्था लावण्यात शहरात नवीनच आल्यामुळें वाटणाऱ्या नाविन्यात व सर्व सोयी पूर्ण होण्याकरता लागणाऱ्या हेलपाट्यात वेळ जात होता."

"दुसऱ्याच वसंतऋतूंत असा एक प्रसंग घडला की, पुढल्या सगळ्या संसारचित्राचा त्यानं पायाच घातला. तिची प्रकृती जरा अशीतशीच होती. आणि तेवढयांत डॉक्टरानी तिला पुन्हा मातृपद स्वीकारण्याची बंदी केली. इतकेंच नव्हे तर, संततीनियमनाची सर्व माहिती साधनासकट तिला शिकविली मला हा प्रकार बीभत्सच वाटला व मी माझी त्याला स्पष्ट नापसंती दर्शवली. पण, तिन हटवादीपणानं माझं सागणं झिडकारुन डॉक्टरच्या सल्याप्रमाणं वागणं ठरवलं. पोटापाण्याची आबाळ असली तरी कामकरी शेतकऱ्याला पोराची गरज असते आणि संततीची गरज आहे हाच त्याच्यातील स्त्रीपुरुष उपभोगाच्या समर्थनाचा पाया आहे. आपल्यात ज्याना संतती आहे त्याना त्याची गरज नाही. उलट आपल्या त्रासाला आणि खर्चाला ही कारणीभूत आहेत. थोडक्यात पोरं म्हणजे डोक्यावर भारच आहे; पण मग आपल्या विषयलंपट आयुष्याचं समर्थन कसं करायचं! मग कृत्रिम साधनांनी प्रजोत्पादन बंद तरी करायचं किंवा दुर्दैवानं या साधनानी दगा दिलाच, तर पोराना आपत्ति समजायचं आणि हें तर जास्तच वाईट पण काहीं असलं तरी, तोंड बंद करण्यासारखं समर्थन आपल्याजवळ नाहीं हे खास! आणि आपला नैतिक अध:पात इतका झालाच, कीं आपणांस समर्थन असण्याची गरजही वाटत नाहीं. आज सुशिक्षित समाजातले बहुतेक सर्व—स्वतःच्या सद्सद्विवेक बुद्धीला पश्चातापाची टोचणी न लावता—याप्रमाणे वागत आहेत जिथे सद्सद्विवेक बुद्धीचं अस्तित्वसुद्धा नाहीं. तिथें

पश्चातापाची अपेक्षा करण धोक्याचंच आहे. आता जनमतालाच सद्सद्विवेकबुद्धी समजायचं ठरवलं तर .मात्र याला रानटी कायदा म्हणता येईल. आणि या वागणुकीचं व्यक्तीलाही काही वाटत नाही आणि समजालाही धक्का बसत नाही. मग समाजात सगळयानीच सद्सद्विवेकबुद्धीला फांटा देऊन वरीलप्रमाणं वागत असताना नागड-प्रदर्शन करण्यात मला लाज कसली! शिवाय यात फौजदारी गुन्हाही होत नाही. शारीरिक गरजेच्या दुबळेपणामुळं व्यभिचाराचा बळी पडून ज्याचं शील उकिरडयावर आलं, त्याना कैदेची शिक्षा अगदी ठीक आहे; पण आम्ही तेच योग्य वेळीं मानापानात तोच गुन्हा पचवीत आहोत!

"दोन वर्षांच्या अवधीत डॉक्टरनी पुरवलेल्या साधनाचा व शिक्षणाचा दृश्य परिणाम होऊं लागला. बायकोचा चेहरा खुलला. तिच्यातल्या मोहकपणाला भलताच रंगेलपणा चढला. या फरकाची तिला जाणीव होती आणि या फराकाचं तिला महत्त्वही वाटू लागलं. तिचं सौंदर्य दिलखेचक व वेधक होतं. तीस वर्षांच्या वयाला मातृपदाची जबाबदारी नसताना [illegible] दंग असणाऱ्या चिडखोर स्वभावास साजेसंच हें सौंदर्य होतं. जिथं जाईल तिथं पुरुषांच्या नजरा हिच्याकडे खिळलेल्या असायच्या. बरेच दिवस ठाणावर बांधलेल्या नाठाळ घोडयासारखी तिची वृत्ति होती. बहुतेक बायकाना जसा धाक नव्हता—तसा हिलाही कोणाचा लगाम नव्हता. मी हें जाणलं आणि मला भीतीचा धक्का बसला."

## — १९ —

तो एकदम उठला आणि खिडकीकडे गेला. 'माफ करा हं' त्यानं म्हटलं आणि निश्चल दृष्टीनें तो थोडा वेळ बाहेर पहात राहिला. एक दीर्घ निश्वास सोडून तो पुन्हा जागेवर येऊन बसला.

त्याच्या चेहऱ्यात भलताच बदल झाला होता. त्याच्या नजरेत दीनपणा दिसत होता, तर ओंठावर विलक्षण हास्य दिसत होतं. 'जरा दमल्यासारखं वाटतंय, पण गोष्ट मात्र पुरी करतो. अजून वेळ पुष्कळच आहे. पहाट काहीं झालेली नाही."

"हो!" त्याने सिगरेटचा झुरका मारून बोलण्यास सुरवात केली. "मुलं होण्याचं बंद होताच ती चागलीच सुदृढ व सतेज दिसूं लागली. पोराची काळजी व त्यामुळें होणारा त्रास पार पळाला. गाडी अगदी पूर्वपदावर आली.

"दारुच्या निशेंत झिंगलेला माणूस जसा शुद्धीवर येतो, त्याप्रमाणें तिला आपल्या भोंवतालच्या आनंदी जगाचा व त्यातील सुखाचा अभिलाष वाटूं लागला. आतापर्यंत याचा तिला विसर पडला होता. यातलं सुख मिळवण्याचं ती चुकली होती. 'आता पूर्ण उपभोग घेतला पाहिजे, नाहींतर वेळ टळून जाईल.' हें विचार तिच्या मनात येत असावेंत, अगर खरो-खरीच तिला हे पटत असावं, असा माझा समज झाला. जगात ज्याला 'प्रेम' म्हणतात, त्याच्याशिवाय सगळं व्यर्थ आहे. असंच तिला शिक्षण दिल असताना, याशिवाय दुसरं तिच्या

मनांत तरी काय येणार हेंच मला समजत नाही आतां लग्नानतर ' प्रेमा ' चा थोडा अनुभव तिला मिळाला असेल, पण त्यामुळं तिची अगदीं समाधानी झाली अगर तिच्या अपेक्षाप्रमाणें सर्व तिला मिळालं असं मुळीच नाहीं. पुष्कळ निराशा तिच्या पदरी आली होती. भ्रमनिरास होताच--लग्ना-नंतर त्रासही भोगला होता आणि तिला कल्पना नसणारं हें पोराचं लचाड मागं लागून तिला दुःखही झालं होतं. मातृ-पदाचं ऋण झुगारून देण्याचं ज्ञान देणारे हे परोपकारी विद्वान डॉक्टर भेटेसतोंपर्यंत सर्व दुःख आणि त्रास तिनं भोगला होता. त्यामुळं डॉक्टरचा सल्ला म्हणजे तिला संजीवनी वाटली. आणि तिनं पुन्हा ' प्रेमा ' करताच जगायचं ठरवलं !

" मत्सरानं आणि द्वेषानं बरबटलेल्या नवऱ्याच्या प्रेमा-करता ती हपापलेली नव्हती. तर नवीन पवित्र प्रेमाचा निदिध्यास तिनं घेतला होता. निदान तिच्याकडे पाहताना मला तरी हेंच दिसत होतं. आणि यामुळें माझं मन मात्र अस्वस्थ होई. शिवाय, असे विचार ती दुसऱ्याजवळ अगदीं उघड करण्याची एकही संधी तो सोडीना; पण ते माझ्या कानावर यावेंत ही तर तिची इच्छा दिसे ! एक तासापूर्वी अगदीं उलट ती बोलली असती, हेंहीं तितकंच खरं आहे. स्वतःच्या आयुष्यात मौज लुटण्याऐवजीं पोराकरता झिजायचं अगर वेळीं अवेळी मातृपद स्वीकारून काळजी निर्माण करा-यची, ही केवीलवाणी स्थिति आहे असं ती केव्हां गंभीरपणांत, तर केव्हा चेष्टेनं प्रतिपादन करीत असे. आतां पोरांबद्दल

काळजी सुटून स्वतःची निगा राखण्यात ती जास्त दंग असे. स्वतः चांगलं दिसावं व सुखं भोगावींत, या बाबीकडे तिचं लक्ष लागलं, पण ती हे उघड मात्र दिसू देत नसे एकाद्या कलेचा व्यासंग असावा असंसुद्धा तिच्या मनानं घेतलं. तिनं पेटीची प्रॅक्टीस पुन्हा सुरू केली. पूर्वीसुद्धा तिची याबाबत तयारी चांगलीच होती. पुढल्या संकटाच्या धोक्याची हीच दृश्य प्रस्तावना होती." त्यानं म्लान दृष्टीनं खिडकीतून पुन्हा बाहेर पाहिलं आणि स्वतःची चित्तवृत्ति शक्यतितकी ताब्यात ठेवून त्यानं पुन्हा सुरवात केली. " आणि यावेळी त्या वृत्तीनं आमच्या संसारात प्रवेश केला." त्याचा आवाज अडखळला. त्या व्यक्तीचं नाव सांगणं अगर उल्लेख करणं त्याला त्रासदायक वाटू लागलं. पण निश्चयपूर्वक त्यानं अंतःकरणावरचं ओझं खालीं केलं आणि पुन्हा पुढे सुरवात केली " माझ्यादृष्टीनें तो अगदी नीच होता. माझ्या संसाराचं वाटोळं केलं म्हणून मी असं म्हणत नाही, तर खरोखरीच तो चांडाळ होता आणि तो इतका अधम होता, यावरूनच ही बया किती बेछूट होती याची कल्पना येते. हा नसता तर दुसरा आला असता. हें असं होणं भागच होतं, यात बिलकुल शंका नाही " क्षणभर थांबून त्यानं पुढं सांगितलं "तो एक म्युझिक डायरेक्टर होता थोडा धंदेवाईक, पण जरा संगितप्रेमी–हौशीच होता. त्याचा बाप व आम्ही अगदी शेजारी, पण त्यानं सर्व इस्टेट गमावली होती. एकंदर मुलं तीन. सर्वांची सोय लावली होती. हा सर्वांत धाकटा. आजोळी रहात असे. तिथंच स्वारी पेटी

शिकली आणि आता जलशात साधारण वाजवीत असे. याच गृहस्थाने—"

भाऊसाहेब सुमंताना काही तरी बोलायचं होतं—पण ते प्रयत्नपूर्व कष्टानं त्यांनी दाबलं आणि जरा जलदीन सांगण्यास सुरवात केली.

" तो आजोळी कसा वागत होता हे मला माहीत नाही. पण त्यावर्षी तो तेथे आमचेकडे आला. त्याचे डोळे पाणीदार होते. तोंडावर नेहमी हास्य! मिशाचे आकडे पिळलेले, केस मागे वळवलेले, आणि कपडे अगदी आधुनिक पद्धतीचे. एकंदरीत चेहरा जरा मिळमिळीतच. 'टांकाऊ नाही काही इतका बायकानी म्हणण्यासारखा—आगकाठी अशक्तच, पण बेडौल नाही—अशी स्वारी होती. मिळाल्या संधीचा पूर्ण उपयोग करून गळ्यात पडण्याची वृत्ति; पण जरा कुठं निराशा दिसली की, माघार घेण्याइतका संवेदनीय स्वभाव. मात्र बाह्य डामडौलास शोभून मात्र त्याची ही सर्व वागणूक असे. पायात पेटंट लेदरचा बूट व गळ्याभोवती भडक रंगाची टाय तो वापरी. अशा काही अस्सल व अलौकिक गोष्टी त्यानी जमवल्या होत्या की, त्यामुळं बायकावर छाप बसावी आणि त्याना आपलेपणा निर्माण व्हावा. प्रत्येक बाबीत सूचक बोलण्याची त्याची तऱ्हा होती—तुटक बोलून सोडायचं—जसं काहीं सर्व बाकीचं तुम्हाला माहीत आहे; आणि तुमच्या मनःचक्षूंपुढें सर्व प्रसंग उभा असून तुम्हीसुद्धां ते बोलणं पुरं करूं शकाल. हेंच ते सद्गृहस्थ आपल्या संगितानं पुढच्या सर्व गोष्टीस कारणभूत झाले."

"माझ्या चौकशीच्या वेळीं सर्व गोष्टीचा असा कळस जुळवला होता की, मत्सरानं बायकोचा खून केला असं दिसावं; पण हे खरं नाही. निदान असं म्हणताना त्यात बरीच दुरुस्ती करावी लागेल. माझ्या बायकोच्या पापाबद्दल कोर्टाची खात्री झाली होती व माझ्या अब्रूच्या ( हे त्याचं म्हणणं ) रक्षणाकरता मी खून केला आणि म्हणून मी निर्दोष सुटलों. मी त्याच वेळी सर्व गोष्टी संगतवार योग्य संदर्भानं सांगितल्या, पण याचा अर्थ मी माझ्या बायकोच्या नावावर लोकापवाद येऊ नये म्हणून सांगतोय, असा केला गेला. पण खरोखरी त्या संगीत शास्त्रज्ञाशी तिचे कसे संबंध होते याची मला अगर तिला बिलकुल पर्वा नव्हती. खरोखरी दुःख कशाचं होतं ते मी पूर्वी सांगितलंच आहे एकमेकांमध्यें द्वेषामुळे जो ताण पडला होता व दोघांच्यात गैरसमजाची दरी आडवासून पसरली होती. त्यामुळे थोडा स्पर्श अगर मनोविकाराचा जोर निकाल लावायला पुरा होता. आता आमच्यात भांडणंहि वारंवार होत होतीं आणि त्याचं स्वरूपही रानटी होतं; आणि पाशवी मनोवृत्तीनं प्रदर्शनातच त्याचं रूपांतर होई. तो जरी नसता, तरी दुसरा कोणीतरी निर्माण होऊन हीच कामगिरी त्यानंही बजावली असती. मत्सराला एक कारण पुरत नाहीं असं दिसेलं तर दुसरं उकरून काढलं गेलं असतं. माझं म्हणणं इतकंच कीं माझ्यासारखं आयुष्य असणाऱ्या नवऱ्यानी आज ना उद्या या व्यभिचाराकडे दुर्लक्ष तरी केलं पाहिजे किंवा घटस्फोट तरी घेतले पाहिजेत, नाहीतर माझ्याप्रमाणें बायकोचे खून तरी

पाडले पाहिजेत, किंवा आत्महत्या तरी केली पाहिजे. यातल्या एकाही गोष्टीची गरज नाहीं असं माणसांत कोणी सांपडलं तर मात्र त्याला दुर्मिळ अपवादच म्हटलं पाहिजे. मी स्वतः कितीतरी वेळां आत्महत्या करण्याच्या बेतांत होतो, तर बायकोनं अनेक वेळां विषाचा पेला स्वतःच्या ओंठापासून परत घेतला."

## — २० —

"शेवटची आकाशाची कुऱ्हाड पडण्यापूर्वी असाच प्रसंग एकदा येऊन गेला. काही दिवस आमचे बीन भाडणाचें चालले होते. तात्पुरता तह झाला होता. आणि या तहनाम्याच्या चिंध्या उडवायला दुसरे निमित्त नसल्यामुळें आम्ही प्रदर्शनात पहिलं पदक मिळालेल्या कुत्र्याबद्दल बोललो. 'पदक नव्हे' तिनं उत्तर दिलं 'फक्त सन्माननीय उल्लेख' एवढ्यावरनंच भांडण पेटलं आणि मग निरनिराळे विषय निघून एकमेकांना टाकून बोलायला सुरवात झाली," हें मला नेहमिचंच ठाऊक आहे. सदाची तुमची हीच तऱ्हा' 'तूंच तसं बोललीस.' 'छे! मी तसं कधींच म्हणालें नाहीं. 'म्हणजे मीच खोटा.' वगैरे वगैरे. आणखी एक–क्षणांत मारूं किंवा मरूं, अशा त्वेषांत–भांडण सुरू होणार असं वाटे. हे होणार हें दिसत असल्यामुळं भिऊन तुम्ही संयम स्वीकारणार, इतक्यांत द्वेषाचा संचार होतो. तिची मनःस्थिति तर माझ्यापेक्षां वाईट. माझ्या प्रत्येक वाक्याचा उलट अर्थ करायचा आणि मग विषारी वाक्बाण

सोडून मला जर्जर करायचं. माझ्या सगळया नाजूक जागीं हाणून, व्रण मोकळे करायचे. माझ्या स्वभावातल्या व्यंगाचं इंगित तिला माहीत होतंच. जसंजसं भांडण रंगात आलं, तस-तशा गोष्टी भलत्याच थराला गेल्या. 'तोंड बंद.' मी हेच किंवा असंच कांहींतरी म्हटलं. तिनें खोलीतून बाहेर मुलाच्या-कडे पळण्यास सुरवात केली. मी मागे लागलो. हेतु इतकाच की, तिला सर्व ऐकायला मिळावं. मी नुसतं तिच्या पोलक्याचा बाहीला धरलं असेल, तोंच तिनं मारल्याचं ढोंग करून ओर-डायला सुरवात केली. "बघारे बाबानो! मला मारायचं चाललंय." मी संतापानें ओरडलो. "खोटं बोलूं नकोस." तीही तितक्याच जोरांत किंचाळली, 'ही काही पहिलीच खेप नाही.' सगळया पोरांनी तिला मिठी मारली आणि ही त्यांना शान्त करीत होती. माझं तोंड चालूंच होतं. 'उगीच बनवून सांगूं नकोस. 'तुमच्या नजरेला सगळंच खोटं दिसतं तुम्हाला काय होतंय! खुशाल एकाद्याचा जीव घ्याल आणि सांगाल मरणाचं ढोंग चाललंय म्हणून. आता आपली पूर्ण ओळख पटली. इतकीच तुमची इच्छा!"

"कुत्र्याच्या मोतानं मर!" मी ओरडलों. हे शब्द तोंडा-तून कसे बाहेर पडले याचेंच आश्चर्य वाटतें. मला एकदम भीती वाटूं लागली. इतकं बोलून मी तावडतोब खोलींत जाऊन सिगरेट ओढत बसलों. माजघरात तिची स्वतः बाहेर जाण्याची तयारी चाललेली मला स्पष्ट ऐकूं येत होती. 'कुठं निघालीस!' मी विचारलं, पण मला उत्तर मिळालं नाहीं 'गेली

तर पीडा गेली.' असं म्हणत मी परत खोलींत येऊन स्वस्थ सिगरेट ओढत बसलों. हजारो निरनिराळे बेत व युक्त्या माझ्या डोक्यात •सूडबुद्धीनं व झालेल्या गोष्टीच्या परिमार्जनाकरतां येऊन गेल्या. त्याचा विचार करीत मी पडून राहिलो. एकदा मनात आलं कीं, हिला सोडून कुठंतरी देशातर करावं म्हणजे त्रास चुकला. एकदा तर असा सुखद विचार येऊन गेला की, हिची मागची कटकट संपली की आपण दुसरी नवी मुलगी पहावी. आपला तिचा संबंध तुटला की तिचं मरणंच ओढवलं. एकदा वाटलें घटस्फोट घ्यावा, आणि त्या दृष्टीनें विचारचक्र फिरूं लागलं. मग माझ्या मनांत आलं की हे सर्व मुद्याला सोडून चाललंय. या विचाराचा काही उपयोग नाही आणि माझ्या पवित्र अन्तःकरणावर धूम्रपटल पसरण्याकरता मी जोरानं सिगारेट फुंकू लागलों.

"घरांतले सर्व व्यवहार सुरळीत चालू होते, स्वयंपाकिणीनं विचारायचं 'बाई कुठं गेल्या? केव्हां परत येतील?' 'तुम्हाला चहा आणूं?' मी जेवायला माजघरात जातों, तों पोरांनी माझ्याकडे प्रश्नार्थक तिरस्कारयुक्त कटाक्ष टाकायचा. विशेषतः रामानें—कारण त्याला या गोष्टीचा अर्थ कळूं लागला होता. आम्ही मुकाट्यानं जेवण उरकायचीं, पण तिचा अजून घरीं पत्ता नव्हता. मध्यंतरी दोन निरनिराळ्या भावना माझ्या मनांत येऊन गेल्या. एकदा राग यायचा की, स्वतःच्या गैरहजेरीनं ती मुलांना आणि मला छळते आहे; पण केव्हांतरी घरीं परत येईलच. एकदां अशी

भीति वाटे कीं, ही आता घरी परत न येतां जिवाचं कांहीं बरंवाईट करून घेईल. स्वतःच जाऊन घरी आणावं. पण ती असणार कुठं? बहिणीच्या घरी! पण तिथं जाऊन चौकशी करणं अपमानास्पद. शिवाय, मला छळतेच आहे तर तिलाही त्रास भोगूं दे. स्वतःच्या त्रासाला न जुमानता चार ठिकाणीं फिरून चौकशी करावी, तर मी तिच्या हातातलं बाहुलं बनणार, आणि हीच तर घर सोडतांना तिची अपेक्षा असणार. असं झालं तर प्रकरण भलतंच शेफारून बसेल! पण, ती बहिणी-कडं न जाता स्वतःचं बरंवाईट करून बसली तर? अकरा वाजले, बारा वाजले खोलींत जाऊन स्वस्थ तिची वाट पाहात झोपावे, तर मूर्खपणा पदरी येणार. बरं वेळ जाईना म्हणून काही तरी लिहायला—वाचायला घ्यावं, तर लक्ष लागेना. नुसता रागानें फणफणत, चडफडत वाट पाहात बसायचं, जरा खुट्ट झालं की इकडे तिकडे पाहायचं. असं नुसतं वाट पाहात बसण्याशिवाय गत्यंतर उरत नाही. पहाटे चारचा सुमार झाला तरी तिचा घरीं पत्ता नाहीं. दिवस उगवावयाच्या सुमाराला मला झोंप लागली. मी उठलों त्यावेळीही ती घरीं आलेली नव्हती. घरातलें सर्व व्यवहार सुरळीत चाललेले होते; पण माझ्याकडे पहातांना प्रत्येकाच्या कपाळावर आठ्या आणि आपलं प्रश्नचिन्ह कायम! जसं कांहीं झाल्या गोष्टीत मीच एकटा गुन्हेगार होतो. तिच्या जीवाच्या काळजीमुळें भीति व घरातून निघून गेल्यामुळें राग या दोन्हींचं तुंबलयुद्ध 'अंतः-करणात चालूं असतांनाच अकरा वाजण्याचें सुमारास तिची

बहीण जासुदासारखी घरी ८त्त म्हणून उभी राहिली. पुन्हा आपलं येरे माझ्या मागल्या चालूच आहे. "काय तिची मनःस्थिति झाली आहे. काय, झालं तरी काय?" "काही झालं नाहीं" तिचा हट्टी दुर्दम्य स्वभाव मी सांगितला व आपलं निर्दोषत्व सिद्ध केलं. 'हो—पण जन्मभर हें अस कसं चालायचं! तिची बहीण म्हणाली. 'त्याचा विचार तिनं करावा. मी याबाबद प्रथम पाऊल टाकणार नाही. तिची निराळं होण्याची इच्छा असेल तर घटस्फोट घेऊं दे! मी उत्तर दिलें. बहीण काही साध्य न होतां परत गेली. मी काहीं करणार नाहीं हे निर्विकार मनानें दाबून बोलून गेलो खरा; पण पोरांचें घाबरट दुःखी चेहरे नजरेसमोर पडले की पळत जाऊन आपणच तिला घरी आणावं असं मनात आलं. मी सिगरेट ओढीत खोलीत येरझाऱ्या घालूं लागलो. जेवणापूर्वी मी थोडी ब्रॅंडी घेतली. हेतु इतकाच की, माझ्या मूर्खपणावर पांघरूण पडावं.

"दोनप्रहरी तीन वाजता ती स्वतः टांग्यातून घरीं आली. माझ्याशी कांहीच न बोलल्यामुळें मला वाटलं, हिच्या मनात आता एकी करावयाची असावी म्हणून. मी म्हटलें तूंच माझी निर्भर्त्सना केल्यामुळं मी संतापलो व तूंच या भांडणास कारणीभूत झाली आहेस असं सांगितलं; पण तिनं माझ्याकडे रागाच्या बेपर्वाइनं एक कटाक्ष टाकला. अर्थात् चेहरा तर दुःखानं म्लान दिसत होताच पण ही नरमाई करतां आली नसून पोरांना नेण्याकरता आली आहे व यापुढें एक-

मेकाचं पटणं शक्य नाही हें स्पष्ट झालं. यावर स्वतःच्या कुजकट शब्दानीं तूंच मला डिवचलंस असं मी सांगितलं. त्यावर तिनं माझ्याकडे विजयी पण क्रूर मुद्रेनं पाहून 'पुरे! तुम्हाला पश्चात्ताप झाला आहे.' असं, बोलली. "या विनोदांत काही अर्थ नाही" असं मी बोललो. तेव्हा पुढं ती काही तरी बरळली : पण मला ते उमगलंच नाही, पण ती तावडतोब आपल्या खोलीत गेली व आतून दरवाजा बंद करून घेतला. मी दारावर बरेच धक्के मारले, पण मला उत्तर मिळालं नाही. रागारागानं मी परत फिरलो अर्ध्या तासानं मोठी मुलगी रडत आली व "काय झालेय आईचं समजत नाही.' असं आम्ही दोघेही मिळून म्हणालो खोलीत जाऊन तिच्या बिछान्यावर गेलो सर्वपोषाख करून बाहेर जाण्याच्या तयारीत बिछान्याजवळ ती अस्ताव्यस्त पडली होती, आणि शेजारीच अफूची बाटली दिसली. आम्ही तिला शुद्धीवर आणली, पण लगेच डोळयातून गंगा-यमुना सुरू झाल्या व अशा रीतीने एकीत तो शेवट झाला. आमच्या अन्तःकरणांत द्वेषाची जोपासना चाललीच होती. उलट या भांडणाच्या त्रासानं ती वाढली होती व त्याबद्दल मनात परस्पराना आम्ही दोष देत होतों. याशिवाय दुसरा परिणाम होणं शक्यच नव्हतं; आणि पुन्हा आमचा संसाराचा गाडा मार्गाला लागला.

"महिन्यातून—आठवड्यांतून अशी चढती क्रमानं वाढत वाढत भांडणं दररोज होऊं लागली. पुन्हा भांडणाचा तोच प्रकार तोच शेवट! एकदां तर कंटाळून मी देशांतर करावं

असं ठरवलं. तिकीटसुद्धा काढलं. ही आळीमिळी दोन दिवस टिकली; पण पुन्हा त्वयार्धं मयार्धं करून समेट झाला. मी परगावीं जाण्याचं सोडून दिलं.

— २१ —

हे शिष्ट—गोविंदराव ठोंबे त्याचं नाव. यानी आमचे घरीं पाऊल टाकलं त्यावेळी अशी घराची व मनाची परिस्थिति होती. एका सकाळीं त्याचा मोर्चा आमचें घरीं आला व मी नोकरास त्याना दिवाणखान्यात बसवण्यास सांगितलं. पूर्वीची माझी व त्यांची घसट होती; पण यावेळी तो स्नेहसंबंध लक्षात न आणता जरा जपूनच तो वागत होता. त्याच्या वागणुकींत, बोलण्यात पहिला ऋणानुबंध दिसत नव्हता; पण मी माझ्या वागणुकीत त्याची जानपछान पटवली व त्यानंही ही सूचना बिनादिक्कत शहाणपणाने स्वीकारली.

" त्याला पाहताक्षणीच माझा त्याच्याबद्दल दुराग्रह झाला; पण माझ्या मनावर त्याच वेळी असा काही विलक्षण—दुर्दैवी पगडा बसला की त्यांना हकलून देण्याऐवजी जवळ करावं असंच मला वाटलें. दोन तोंडापुरतें शब्द बोलून वाटेला लावणं काय अवघड होतं? बायकोशी ओळखच करुन दिली नाहीं कीं संपलं काम! पण छे, त्याच्या पेटी—वादनाबद्दल माझ्या कानावर आहे हें मी सांगितलंच पाहिजे. त्यानं हल्लीं त्याचा व्यासंग फारच वाढवला आहे असं सांगितलं व विषय बदलून मलाही पेटीचा नाद होता हें मी सांगून टाकलं. यावर हल्लीं

आपण पेटीला शिवतसुद्धा नाहीं, पण बायकोची मात्र त्यात उत्तम गती आहे, असें उत्तर दिलं. मी त्याला पहिल्या क्षणापासून शेवटपर्यंत माझं त्याच्याशीं वागणं अगदीं विधिघटनेप्रमाणं झालं. त्यात बदल शक्यच नव्हता. त्याच्याशी वागताना माझ्या अंतःकरणावर उगीच, पण ताण वाटे! त्याच्या आणि माझ्या प्रत्येक शब्दाला नी वाक्याला काही कारण नसताना मी काहीतरी हेतू उगीच जोडित असे. मी माझ्या बायकोची ओळख करुन दिली आणि विषय एकदम संगीताकडे वळाला त्यानं आपणहून पेटी शिकवण्याचं कबूल केलं. त्या दिवशीं आणि नंतर नेहमीच—माझी बायको अत्यंत सुंदर—मोहक आणि दिलखेचक दिसतहोती. तिच्यावर प्रथमच त्याची छाप पडली. शिवाय तिला पेटीचा इतका नाद कीं, तिनं एक मास्तरसुद्धा पाहिला होता. आता तर याची मदतच मिळणार म्हणून तिला अधिकच आनंद वाटला. हा आनंद तिच्या चेहऱ्यावर स्पष्ट दिसत होता; पण इतक्यांत आमची नजरानजर झाली व माझी भावना जाणून तिनं आपला चेहरा पालटला. आणि त्या दिवसापासून एकमेकाच्या—आंधळ्या कोशिंबिरीच्या खेळास—लपंडावास सुरवात झाली. मी दिलखुलास हसलों आणि आनंद झाल्यासारखं दाखवलं. सुंदर तरुणीकडे पाहतांना पापी माणसाची असणारी दृष्टि माझ्या बायकोकडे पाहताना त्याच्या नजरेंत स्पष्ट दिसत होती. बोलण्यांतच आपण दंग आहोंत, असं तो ढोंग करीत होता, पण नजरमात्र या वृत्तीला दगा देत होती; तर मत्सरी माणसास शोभणाऱ्या माझ्या नेहमींच्या

खोट्या हंसण्याचा अगर त्याच्या नेत्रकटाक्षाचा आपणावर परिणाम झाला नाही असं दाखवण्याचा बायकोचा प्रयत्न होता. मी त्याला पाहाताक्षणीच मला बायकोच्या डोळ्यात एक निराळीच चमक दिसूं लागली. माझ्या मत्सरामुळं असा काही विजेच्या लाटाचा मिलाफ झाला व त्या दोघात अशा संवेदना सुरूं झाल्या कीं, ही लाजली की त्याच्या गालावर लाली चढलीच. ही हंसली कीं त्याची कळी खुललीच! हवापाण्याच्या इकडच्या तिकडच्या गप्पा मारून तो जायला उठला व आपली टोपी माडीवर आपटीत पुढं आम्ही काय करतो हें पाहण्याकरता थाबला.

"याला पुन्हा घरीं बोलावलच नाही की संपल. मग पुढचा सर्व प्रकार टळला असता. हें माझ्या मनात विजेसारखं चमकून गेलेलं मला आता पूर्ण आठवत आहे. मी त्याच्याकडे व तिच्याकडे नजर टाकली. 'तुझा मला मत्सर वाटतो असा भ्रम क्षणभरसुद्धा करूं नकोस.' तुझ्याबद्दल संशय अगर भीति वाटते असंही नाही.' मी मनात दोघानाही उत्तरं ठरवून ठेवलीं. पुन्हा संध्याकाळी पेटी घेऊन येण्याबद्दल व जरा बायकोला साथ देण्याबद्दल विनंती केली. माझ्या बायकोला आश्चर्य वाटलें. ती लाजली—मनाचा गोंधळ उडाला, आणि आपण कांहीं पेटींत तितके तयार नाहीं, उगीच, त्याना त्रास नको असं पुटपुटूं लागली. तिच्या नकारानं मला चीड आली; आणि मग मी त्याला येण्याबद्दलचा हट्टच धरला. त्याचा तो उलटा भाग पाडलेलं डोकं, पाढरा टाय व परत जातानाची

रंगेलवृत्ति! एकाद्या उड्या मारणाऱ्या पक्षासारखी वाटून काय वाटलं हे अजूनी लक्षात येतं. त्या माणसाच्या सान्निध्यात मला त्रास होतोय हे मी छपवूं शकलों नाही तर पुन्हा त्याची धाड घरावर पडूं नये, असं वागणंही आमच्याच हातात आहे हे मी समजून होतो. पण असं वागणं म्हणजे मी त्याला डरतोय असं होणार, आणि त्याला भिणं म्हणजे माझ्या नामुष्कीची कमालच झाली! मग ठहराड्यात माझं बोलणं बायकोच्या कानावर पडत आहे असं पाहून मी त्याला संध्याकाळीं येण्याबद्दल भलताच आग्रह केला. त्यानही ते कबूल केलं नी तो चालता झाला.

"संध्याकाळी कबूल केल्याप्रमाणे तो आला व दोघानींही पेटी वाजवली; पण त्यात एकसूत्रीपणा नव्हता हिला येत होतें तें त्याला जमत नव्हतं; तर पूर्ण तयारीशिवाय त्याची साथ करणं हिला शक्य नव्हतं. मला संगीताची आवड होतीच, त्यामुळ मी त्यांना मदत करीत होतो. शेवटी इकडची–तिकडची एकदोन पद वाजवून त्यानी एक राग वाजवला. त्याची आवड प्रशंसनीय होती; पण इतका सात्विकपणा त्याच्या स्वभावात नव्हता. बायकोपेक्षा तो फारच सुंदर वाजवीत असे, पण तिला मदत करून मधून मधून तिच्या वाजविण्याची आदरानं स्तुतीही करीत असे बायकोचं सारं लक्ष वाजवण्याकडे होतं व तिची वृत्ती सात्विक व नैसर्गिक दिसत होती. मी माझें लक्ष लागल्याचं ढोंग करीत होतो; पण खरं म्हणजे अन्तःकरणांत सर्व संध्याकाळ–भर मत्सराग्नि धुमसत होता.

" माझ्याबद्दल तिच्या अन्तःकरणात चीड होतीच. त्याबद्दलची अढी आणि आता हा तर नवीन आलेला. शिवाय संगीत–तज्ञ नी देखणा! तेव्हा बायकोवर वजन पडणारच. या कल्पनेनं माझ्या यातना जास्तच वाढल्या. याच्याच जोडीला त्याना आता आणखी प्रॅक्टीसकरता एकात मिळणार! संगीताचं ते मधूर वातावरण नी त्याचा भावनाप्रधान माणसावर होणारा परिणाम यावरून हा नुसता बायकोवर छाप मारूनच राहणार नाही तर तिचं सर्वस्वही हरण करील, यात मला शंका राहिली नाही; आणि यामुळेच माझा मनःस्ताप वाढला. आणि अशी परिस्थिति असताना किंवा यामुळेच माझ्या मनावर अदृश्य शक्तीचा असा काही पगडा बसला की, मी त्याचेशी नुसतं आदरानच नव्हे. तर लोभानं वागूं लागलो. आता असं वागताना बायकोला आणि त्याला माझी निर्भय वागणूक दाखवायची होती, का ही निव्वळ आत्मवंचना होती. काय हेतु होता हेंच समजत नाही! एवढं खरं की प्रथमपासून त्याच्याशीं माझी वागणूक अनैसर्गिक व दांभिकपणाचीच होती

" जागच्या जागी त्याचा खून करण्याच्या माझ्या इच्छेला दाबण्याकरता त्याचेशी प्रेमाने वागणं मला भाग होतं. त्या दिवशी जेवतांना मी त्याला उंची दारु दिली. विशेष प्रेमानं बोलणं ठेवलं. त्याचं वादन ऐकणाराला किती एकतान करतं हें सांगितलं. इतकंच नव्हे. तर पुढच्या रविवारचं जेवणाचं आमंत्रणही देऊन बायकोची मधून मधून करमणूक करण्याकरतां सोबत करण्याबद्दल विनंती केली. आमच्या काही संगीतप्रेमी

स्नेह्यांना बोलावून एकदा तुमचं हे सर्व ऐकवूं असं सांगून तो दिवस संपविला."

इथं भाऊसाहेब सुमंताचा गळा भावनेनं दाटून आला ते जागेवरच चुळबुळ करूं लागले.

"या माणसाच्या सान्निध्यात मला किती त्रास होत असे याचं आश्चर्य वाटतं स्वतःच्या भावना दाबून तो बोलूं लागला." तीन-चार दिवसांनी मी सिनेमाहून घरी परत आलो आणि एकदम अन्तःकरणावर दगडासारखं ओझं पडल्यासारखं वाटलं. पण कारण मात्र लक्षात येईना. मागाहून लक्षात आलं की, व्हराड्यात काही तरी दिसल्यामुळे त्या गृहस्थाच्या आठवणीनं असं वाटलं. मी माझ्या खोलीत आल्यावर व्हराडयात काय दिसलं हे लक्षात आलं, आणि खरं-खोटं करण्यासाठी मी पुन्हा व्हराडयात आलों. त्याचा फॅशनेबल ओव्हरकोट तिथं खुंटीला अडकवलेला होता त्याच्याबद्दलच्या कोणत्याही बाबतीत मी जरा भावनाप्रधान होतो, आणि याही वेळीं कोट पाहताच तीच वृत्ती बळावली; पण माझ्या लक्षात मात्र ती आली नाहीं. मी नोकराकडे चौकशी केली. तो वरी आला असल्याचं कळलं. गॅलरींतून खोलीमध्ये जाण्याचे ऐवजी मी मुलाच्या खोलीतून गेलों. हॉलमध्ये वाजत असलेल्या पेटीचे सूर व मधून मधून दोघांचं चाललेलं संभाषण ऐकूं येत होतं. मी कान देऊन ऐकण्याचा प्रयत्न केला; पण अर्थबोध होईना. स्वतःच्या बोलण्याचा आवाज–कदाचित् चुंबनाचा सुद्धा–बाहेर ऐकूं येऊं नये म्हणूनच हे पेटीचं निमित्त स्पष्ट दिसत होतं. बापरे!

किती भयकर कल्पना माझ्या डोळ्यांत थैमान घालूं लागल्या! काय विचित्र चित्र माझ्या मनःश्चक्षूपुढे उभं राहिलं. आतासुद्धा नुसत्या आठवणीनं संताप वाढतो आहे.

"मी अगदी दिङ्गमूढ झालो. माझं हृदय दाटून आलं नी काळजावर घाव घातल्यासारखं वाटूं लागलं. या रागाच्या व द्वेषाच्या भावनेत स्वतःबद्दलची कीवच वाटत होती. 'पोराच्या देखत नर्सच्या समोर' मी मनाशी विचार केला. माझा चेहरा अगदी भयंकर दिसला असला पाहिजे. कारण मोठी मुलगी माझ्याकडे पाहताच तिचाही चेहरा पाढरा फटफटीत पडला. काय करावे,' मी मनाशी विचार करूं लागलों. 'आत जाणं शक्य नाही माझ्या हातून आत गेलों तर काय होइल हे एका परमेश्वरालाच माहीत. बरं बाहेरही थाबवेना.' माझी परिस्थिति लक्षात आली अशा दृष्टीनं ती माझ्याकडे पहात होती.

"आत गेल्याशिवाय गत्यंतर नाहीं. असा विचार, करून मी खाडकन् दरवाजा उघडला तो पेटी वाजवत बसला होता व शेजारीच ही उभी होती. माझ्याकडे तिची प्रथम नजर गेली. ती घाबरली होती आणि वरून शांत असल्याचा डौल केला होता. का खरोखरीच तिची चित्तवृत्ति स्वस्थ होती? मला काहीच सांगता येत नाही; पण तिला धक्का बसला नाही अगर तिनं हालचालही केली नाही हे खरं! फक्त ती जरा लाजली आणि तेही कुंकळ वेळ गेल्यानंतर

"तुम्ही परत आलांत, आनंद वाटला येत्या रविवारी काय वाजवायचं ते आम्ही अजूनी ठरवलंच नाही." तिचा

आवाज असा काही वाटला कीं, जो आमच्या एकान्तात मी कधीच ऐकला नव्हता. हा आवाज आणि त्याच्याबद्दल व स्वतःबद्दल म्हणून वापरलेलं 'आम्ही' याचा मला संताप आला. मी मुकाटयानं केलेल्या नमस्काराचा त्याने मानेनंचं माझ्या समजूतीप्रमाणं कुत्सित-हंसत स्वीकार केला व रविवारी रागदारी वाजवावी का एक दोन पदं वाजवून वेळ मारुन न्यावी, याबद्दल अजून एकमत होईना म्हणून सांगितलं, हें इतकं साधं आणि नैसर्गिक चाललं होतं की, मला फाटे फोडायला जागाच सापडेना. पण माझी नक्की खात्री की, हे सारं खोटं आहे आणि माझ्या डोळ्यात धूळ फेकायला हें नाटक चाललंय हे स्पष्ट दिसत होतं.

" आपल्या समाजात फॅशनेबल लाईफ म्हणून स्त्री-पुरुषांना सर्व धोके पत्करून उघड्या डोळयानी एकमेकात मिसळण्याची मोकळीक देण्याची पाळी एकाद्या मत्सरी माणसावर आली, म्हणजे किती यातना होतात याची कल्पना नाही ( आपल्या समाजातील सर्वच लोक मत्सरी आहेत ) डायरेक्टर आणि नटी, डॉक्टर आणि स्त्री पेशंट, चित्रकार आणि त्याचं मॉडेल, संगीततज्ज्ञ आणि त्याची शिष्या, याच्यातल्या संबंधांच्या आड यावयाचा प्रयत्न केला, तर आपणच ह्या जगात मूर्खपणा पदरी घेतल्याशिवाय शक्य नाही.

" दोघंही कलेची उपासना-जोपासना करताहेत नी इतका एकमेकाना संसर्ग असणारच, आणि अशा मनमोकळ्या वागण्यांत-वागणुकींत मत्सरी आणि दुष्ट नवऱ्याशिवाय इतरांना

दोषास्पद कांहीच वाटणार नाही. आणि सर्व लोकांना हेंही माहीत आहे की, आपल्या समाजांत अशा कलोपासनेत गुंतलेल्या लोकांतच अनीतीनं आपला नंगा नाच घातला असून तिथंच सर्व व्यभिचाराचं मूळ रुजत आहे.

" माझ्यामुळे पेच निर्माण होऊन मी त्या जोडींत थोडी फाटाफूट निर्माण केली बराच वेळ माझ्या तोंडातून शब्द फुटेना. काठोकाठ पाण्यानं भरलेली बाटली एकदम उपडी केली तर जसं पाणी बाहेर येत नाही, तशी माझी स्थिति झाली खूप निर्भर्त्सना करून घरातून त्याला हाकलून द्यावं अशी इच्छा होती. पण आपण त्याचेशीं गोडीनें आणि प्रेमानं वागणं भाग आहे असं वाटे मी तसाच वागलो. मनाच्या सुचनेनुसार त्याची वागणूक पसंत पडल्याचे मी ढोंग केलं. त्यामुळे बाह्य देखाव्यातच त्याच्याबद्दल आदर—सभ्य वागणूक दिसत होती, तर अन्तःकरणात त्याला पाहून मानसिक संतापाला ऊत येत होता. त्याची निवड चुकणार नाही आणि त्याच्या म्हणण्याप्रमाणें जगावं असं मी बायकोला सुचविलं माझ्या एकदम येण्यानं जी भीषण शान्तता निर्माण झाली होती व माझ्या चेहऱ्यावर जे भयानक दृश्य होतं ते जाईपर्यंतच तो थांबला दुसऱ्या दिवशीं काय प्रॅक्टीस करायचे ते ठरविल्यासारखं करून तो जाण्याकरता निघाला. संगीताच्या मैफलीबद्दल त्याला विशेष काही वाटत नाहीं, अशी त्यानें माझी समजूत करून दिली. एखाद्या खुशमस्कऱ्यासारखा व्हराड्यात—( संसाराचा सत्यानाश करणारास इतका आदर दाखवलाच पाहिजे )—त्याचेबरोबर जाऊन संवयीप्रमाणें प्रेमानं हात धरला.

## — २२ —

" त्या सबंध दिवसात मी बायकोशी चकारशब्दसुद्धा बोललों नाही. मला बोलणे शक्यच नव्हते. तिच्या सहवासाने माझ्या अंतःकरणात असा द्वेषाचा डोंब उसळायचा की, माझी मलाच भीति वाटायची. जेवताना सर्व मुलांच्या देखत मी आमच्या गावी कधी जाणार—बाकी चार—आठ दिवसात मला जाणं भागच होतं—म्हणून विचारलं. मी नक्की दिवस सांगितला. मला बरोबर नेण्याकरता काही लागेल का म्हणून तिनं चौकशी केली. मी मानेनंच नकार दिला. मुकाट्याने सर्वांची जेवणे संपवली व मी आपल्या खोलीत गेलो. हल्ली ती [illegible] ली [illegible] फिरकत नसे. विशेषतः या ठराविक वेळी तर ढुंकूनसुद्धां पहात नसे. सतापाने मनात काहूर उसळल्यामुळें मी स्वस्थ पडलो होतो. इतक्यात माझी बायको स्वतःच्या पापावर पांघरूण घालण्याकरता खोलीकडे येते आहे अशी माझी मूर्खपणाची समजूत झाली. " खरोखरच ती माझ्याकडे येत असेल का? तिची पावलं जवळ जवळ ऐकूं येऊं लागल्यामुळें मी मनात म्हणालो. " म्हणजे माझी समजूत बरोबर होती तर! तिच्या हातून व्यभि ....... कल्पनातीत तिरस्कार माझ्या मनात भरला. पावलं तर जवळ जवळ ऐकूं येऊं लागली; पण कदाचित् हॉलमध्यें कशावरून जात नसेल? छेः इतक्यांत माझ्या खोलीच्या दरवाज्याची करकर कानावर आली. आणि तिची ती उंच, प्रमाणबद्ध, मोहक, सुंदर मूर्ति माझ्या दृष्टीस

पडली. तिच्या चेहऱ्यावर व डोक्यात बावरी भीति दिसत होती तर अन्तःकरणांत माझ्या पोटांत शिरून प्रेम संपादन करण्याचा विचार स्पष्ट दिसत होता. ही भावना लपवण्याचा तिचा सारखा प्रयत्न चालू होता. पण हें माझ्या ध्यानात आलं नी याचा अर्थही मी जाणून होतो. माझा ऊर इतकं भरून आलं की मी घुसमटलों; पण लगेच मी सिगारेट काढून ओढत बसलों.

'एकादं माणूस गप्पागोष्टी करायला आलं तर सिगरेट काढून धूर सोडीत बसणं तुम्हाला शोभतं का?" माझ्याच कोचावर बसत हळूंच माझ्या अंगावर रेलत ती म्हणाली. तिचा संसर्ग टाळण्याकरता मी जरा दूरच सरकलों. 'अस्सं! रविवारचा प्रोग्रॅम तुम्हाला पसंत नाहीं असं दिसतं,' ती बोलली. 'छेः मला त्याचं काहींच वाटत नाहीं,' मी उत्तर दिलं. 'मला हें समजत नाही असं तुम्ही समजतां काय?' 'इतकी अक्कल असेल तर नशीबच म्हणायचं. पण हें तुझं नखरेल वागणं एखाद्या बाजारबसवीला शोभण्यासारखं...!' 'असा माझा अपमानच करायचा असला तर मीच जातें कशी.' 'खुशाल चालती हो! पण ध्यानांत ठेव, घराण्याच्या अब्रूची तुला पर्वा नसेल, तर तुझी मला काडीइतकीही किंमत नाही. घराण्याची अब्रू मला प्राणापेक्षां प्यार आहे!' 'अस्सं काय! काय बोललात! चालती हो! काळं कर!' तिला माझं म्हणणं कळलं नाहीं का न कळल्याचं तिनं ढोंग केलं कुणास ठाऊक. ती फणकाऱ्यानें उठली, पण खोलीच्या बाहेर न जाता

मध्येंच उभीं राहिली. 'आता मात्र वीट आला तुमच्या सहवासाचा! काय पण तऱ्हेवाइक मासला आहे सती-सावित्री स्वर्गातून अवतरली तरी शक्य नाहीं. संसार करण तुमच्या-बरोबर.' नेहमीप्रमाणे माझ्या व्रणावर घाव घालण्याकरिता ती बोलली. बहिणीला टाकून बोलल्याची तिनं मला मुद्दाम आठवण करून दिली. एकदा संतापानं बेभान होऊन मी बहिणीला अद्वातद्वा बोललो. नुसत्या आठवणीनं मला मरणप्राय दुःख होई. तेवढंच नेमकं शस्त्रं तिनं उपसलं. "सख्ख्या बहिणीशी वागणूकीची ही तऱ्हा, मग आम्ही तर काय—काहीही शोभेल." तिचं चऱ्हाट चालूंच होतं 'माझा पाणउतारा, मानहानी, अपमान करून हिचं समाधान होत नाही' मी मनात म्हणालों, आणि तिच्याबद्दल संतापान माझं माथ फिरून गेलं. दोन लाथा माराव्यात असा विचार केला, या विचारानं मी उठून उभा राहिलो—रागाच्या तावडींत आपण करतोंय हें बरोबर आहे का? असा अंधूक विचार मनात आला, पण शेवटी निश्चय ठरला की, हेंच बरोबर. त्यामुळे निदान तिला जन्माची आठवण राहील. आणि या विचारात माझा राग भडकतच गेला. आणि जसा संताप वाढूं लागला, तसतसं मला समाधान वाटूं लागलं.

'चालती हो? नाहींतर जीव घेईन.' रागानें मी तिचा दंड धरून बोललों. रागाच्या भरांत माझा आवाज आपोआपच मी वाढवला. माझा चेहराही संतापानं इतका लाल झाला होता कीं, खोलीतून भीतिनं तिला पाऊलसुद्धां उचलवेना. 'काय

झालंय काय तुम्हाला आज ' एवढंच ती म्हणाली. ' काळं कर! चालती हो!! वेड लागण्याची पाळी आली. काय परिणाम होईल सांगवत नाही! ' मी एकदम कडाडलो.

" रागानं माझ्या डोळ्यावर अंधता आली होती, आणि हातून कांहींतरी वेडवाकडं करावं आणि एकदा रागाचा सोक्ष-मोक्ष करावा अशी मस्ती होती."

" तिला मारावं—तिचा खून करावा—अशी अनिवार इच्छा. पण हातून तर हें होणार नाही. म्हणून मी टेबलावरचा पेपरवेट उचलला व तिच्या पायाशेजारीच जोरात हाणला. बाकी तिला तो लागूं नये अशी मी काळजीही घेतली. तिनं खोली सोडली, पण दरवाज्यांत जाऊन माझ्याकडे पाहूं लागली. आणि तिचं लक्ष वेधण्याकरता मग मी टेबलावरचा आरसा, दौत वगैरे जमिनीवर भिरकावण्यास सुरवात केली. तोंडानं ' चालती हो ' ' काय परिणाम होईल कळत नाहीं ' चाललंच होतं. ती निघून गेली आणि मी एकदम थंडच पडलो! एक तासानं नर्स आली व बायकोला उन्मादवायू ( Hysteria ) झालाय असं तिनं सांगितलं. मी खोलीत गेलों, तेव्हा तिचं सर्व शरीर कापत होतं—तोंडांतून शब्द बाहेर पडत नव्हता. क्षणांत रडणं तर क्षणात हंसणं चाललं होतं. हें कांहीं ढोंग नव्हतं. ती खरोखरीच आजारी होती.

" पहाटेच्या सुमारास तिला बरं वाटूं लागलं, आणि तुम्ही ज्याला ' प्रेम ' म्हणतांना त्याचा आधार घेऊन आम्ही भांडणाचा निकाल लावला. दुसऱ्या दिवशीं मला गोविंदराव

ठोंबेबद्दल मत्सर वाटल्याचें मी कबूल केलं. त्याचं तिला आश्चर्य वाटलं नाही. उलट आपल्याला त्या माणसाबाबद प्रेम वाटेल अशी वेडगळ समजूत कशी केलीत म्हणून मलाच तिनं वेड्यांत काढलं आणि मनमुराद हंसूं लागली.

" एकाद्या कुलीन लग्न झालेल्या बाईला त्या माणसाच्या संगीताशिवाय त्याच्यातलं काय आवडणार? तुमची इच्छा असेल तर यापुढे त्याचं तोंडसुद्धा पहाणार नाही. तुम्हीच रविवारी लोकाना बोलावलंत् नाहींतर खुशाल मी आजारी आहे असं त्याना कळवा म्हणजे कटकट मिटली. बाकी तुम्हाला त्याचा इतका बाऊ वाटतो हें त्याला कळणं म्हणजे त्याला भलतंच महत्त्व देण्यासारखं आहे. आणि याचीच चीड येतें. अशी समजूत करून घेतली की, मग मात्र माझ्या अभिमानाला डिवचल्यासारखं ती बोलत होती. तिच्या बोलण्यात त्याच्याबद्दलचा तिरस्कार व्यक्त होत होता. त्याच्यापासून स्वतःच रक्षण करण्याची वृत्ती स्पष्ट दिसत होती, पण बिचारी फसली. परिस्थितीच तिच्याविरुद्ध होती. विशेषतः त्याच्या संगीतानं तिचा गळा कापला.

" अशा रीतीनें हें प्रकरण संपलें. रविवारीं सर्व स्नेही आलें. कार्यक्रम पार पाडला ! "

## — २३ —

" माझ्यांत पोकळ दिमाख भरला होता हें सागायलाच पाहिजे असं नाहीं. माणसाला अहंकाराशिवाय जगणंही कठीण

आहे. रविवारी जेवणाचा व संगिताचा कार्यक्रम उत्कृष्ट व्हावा म्हणून मी फार श्रम घेतले. बाजारातून स्वतः जिन्नस आणलें, तर सर्व सोबत्याना समक्ष आमंत्रण दिले. सहाच्या समारास सर्वांच्या बरोबरच तोहि आला. त्याचे कपडे झकपक होते, बाकी शर्टला लावलेली हिऱ्याची बटनं मात्र मला आवडली नाहींत. सहजगत्या हंसत–खेळंत तो सर्वांशी वागत होता जरा हंसत प्रत्येकाना रंजवीत होता. प्रत्येकाकडून आपल्या अपेक्षेप्रमाणेंच वागणं अगर बोलणं होत आहे असं दर्शविण्याची संमतीदर्शक त्याची वागणूक होती. त्याचे हे तिरस्कारणीय दोष व स्वभावातील वैशिष्ट्य मी लक्षात ठेवीत होतो व त्यामुळे समाधान वाटत होतं. इतक्या खालच्या दर्जाला माझी बायको जाणार नाही, अशी माझी मी समजूत करून घेतली. मला आता त्याच्याबद्दल मत्सर वाटेना. मत्सरामुळें होणाऱ्या त्रासाचा कडेलोट झाला होता, आणि आता त्याची भरपाई मला करायची होती. शिवाय बायकोच्या वचनावर विश्वास आहे असं मला दाखवायचं होतं माझी तशी श्रद्धा होतीही. माझ्या मनात मत्सर नव्हता, तरीपण त्याच्याशी अगर तिच्याशी वागताना, जेवताना माझी इच्छा असूनसुद्धा मोकळेपणा वाटत नव्हता. जेवण संपून संगीत सुरू होईपर्यंत असाच वेळ गेला. त्याच्या चेहऱ्यावर हालचालीवर माझी बारीक नजर होती व त्याची फोड मी मनांत करीतच होतो. नेहमींप्रमाणे जेवण कंटाळवाणंच झालं आणि संगीताला सुरवात झाली.

" एकूणएक चित्र माझ्या डोळ्यासमोर आहे. त्यानं पेटी कशी काढली, त्यावरचा अभ्रा-कोणत्या तरी बाईनें विणलेला- कसा बाजूला ठेवला प्रथम सूर कसा धरला. माझी बायको शेजारी कशी बसली. तिच्या चेहऱ्यावर बेपर्वाई कशी दिसली. अंतःकरणात स्वतःच्या शक्तीबद्दल अविश्वास तिला कसा भेडसावीत होता, प्रथम रागाचे सूर कसे काढले गेले नी त्यानी एकमेकाकडे कसं पाहिलं नंतर सगळ्यावर कशी दृष्टि टाकली. सर्वच्या सर्व डोळ्यासमोर असून पूर्ण आठवत आहे. त्यानं वाजवण्यास सुरवात करताच त्याचा चेहरा दयार्द्र आणि गंभीर झाला. व लीलेनं बोटे नाचूं लागली. तिनं साथ करायला सुरवात केली. "

इथं भाऊसाहेब सुमंत थोडे थांबले, एकदा सिगरेट ओढली आणि पुन्हा सुरवात केली.

" त्यानी मेघमल्हार राग वाजवला. तुम्हाला त्याचं कडवं आठवत का? पहिला भाग तर चांगलाच आहे. बाकी संगीताची गोडीच निराळी आहे! मला विशेष कळत नाही. संगीताचा आपल्यावर काय परिणाम होतो आणि जो परिणाम होतो तो कशामुळें व का होतो?

" संगीतानें आत्मोन्नति होते असं म्हणतात. साफ खोटं आहे हे. संगीताचा आपल्यावर परिणाम होतो, हें खरं; पण परिणाम होतो-निदान माझ्यावर तरी उलटा परिणाम होतो. संगीताने अंतःकरणाला समाधान मिळत नाहीं अगर अधो-गतीहि नाही. फक्त मन डिवचलं जातं. तुम्हाला हें स्पष्ट कसं

समजावून देऊं हेच कळेना. संगीतानं आपण स्वतःला व भोंवतालच्या परिस्थितीला विसरतो व भलत्याच भ्रामक वातावरणांत नेलें जातो. संगीतानं ज्या भावना निर्माण होतात, त्याप्रमाणे वागणंही शक्य नसतं. संगीताचा परिणाम म्हणजे दुसऱ्यानं जांभई दिली की, आपणहि द्यायची. मग झोप आलेली असो किंवा नसो; किंवा दुसरा हसला की आपणही हंसायचं. गाणं रचणाऱ्याच्या ज्या भावना असतील त्यात मी एकदम ओढला जातो, त्या भावनांचाच माझ्यावर पगडा असतो. त्याच्या भावनेच्या प्रवाहाबरोबर मी वहातच जातो; पण मी माझ्या स्वत्वाला कां विसरायच हेंच कळत नाही. ' प्रेम कोणीहि करेना, का अशी फिर्याद खोटी, " रचताना कवीला त्या भावनांचा अर्थ कळाला होता. मला या भावना अगदीं निरर्थक आहेत. त्यामुळे संगीतानं फक्त खळबळ उडते. समाधान मिळत नाही. तेच लष्करी बॅंड घ्या, निदान फौज तालावर चालते. नाचाची गत वाजवा, निदान नाच तरी सुंदर होईल. अभंग म्हटले, तर परमेश्वर-भक्तीनें मोक्ष तरी मिळेल. यात संगीताचा उपयोग तरी खासच आहे. इतर ठिकाणी नुसता धागडधिंगा आणि भावनांचा खळबळाट आहे! चीनमध्ये संगीताला राष्ट्रीय महत्त्व आहे आणि ते बरोबर आहे. पण कोणत्याही देशात एकाद्या व्यक्तीत संगीतामुळें लहरीप्रमाणे कोणावरही मोहिनी टाकून त्याला गुलाम बनवायचा, हे तुम्हाला पटतं कां ? आणि हीच मोहिनी घालणारी व्यक्ति अनीतिमान वर्तनाची असली कीं आटोपलाच कारभार !

" व्यवहारज्ञ व्यक्तीच्या हातात हे एक भयंकर अस्त्रच सापडलें आहे. आताचच उदाहरण घ्याना ! पहिलं कडवं झिरझिरीत कपडे नेसलेल्या बायकोसमोर म्हणण्यासारखं आहे का? ते म्हणायचं—त्याची स्तुति करायची. लगेच कॉफीपान आणि गप्पागप्पा ठोकायच्या ! काही काही प्रसंगानुरुप योग्य ते राग वाजवले तर काही हरकत नाही. त्या संगीताप्रमाणें काही कृतीची अपेक्षा आहे. त्यांनीं तुम्हाला उत्तेजन मिळून तुम्ही कार्यप्रवृत्त होता; पण इथं तुमच्या भावनेला डिवचायचं समाज ... कृतीची अगर परिणामाची मात्र अपेक्षा नसायची. यामुळे तें शास्त्र मारक होतं. "

" निदान माझ्यावर तरी त्या कडव्याचा भलताच परिणाम झाला. माझ्या भावना उद्दीपित झाल्या. स्वप्नांतसुद्धा नसलेल्या गोष्टी स्पष्ट दिसूं लागल्या. आतापर्यंतचे विचार आणि आयुष्य फुकटच म्हणायचं तर ! मी मनाशी म्हणालो त्या भावनाचा मला उपयोग काय, हेंच मला समजेना. पण मला त्यामुळें आनंद मात्र वाटत होता. भोवतालचे माझें स्नेही—माझी बायको—तो—या सगळ्याकडे पाहण्याची माझी दृष्टीच बदलली. यानंतर त्यांनी सटरफटर इतर पदें वाजवली. नंतर आग्रहावरुन इतर जरा लोकप्रिय गाणी झाली; पण याचा पहिल्याच्या एक-शतांशहि माझ्यावर परिणाम झाला नाहीं. अशा रीतीनं सबंध वेळ मोठ्या मजेत नी आनंदात गेला. माझी बायको त्या दिवसासारखी त्यापूर्वी कधीच दिसली नव्हती. तिच्या डोळ्यात चमक दिसत नव्हती; तर चेहऱ्यावर सुस्ती दिसत असून

मृदु हास्य चमकत होते. हें सर्व मला दिसत होतं, पण माझ्याप्रमाणेच तिलाहि वाटत असेल—तिच्याहि भावना उद्दीपित झाल्या असतील—या पलीकडे मी त्याचा अर्थ केला नाही. अशा रीतीनें छोटासा समारंभ संपला व सर्व मंडळी आपापल्या घरी गेली.

" आता दोनच दिवसात मला गावी जावयाचं असल्यान पुन्हा परत गाठ बरेच दिवसांनी पडेल, असं गोविंदराव ठोंबे यानी जाता जाता सुचवलं. म्हणजे माझ्या गैरहजेरीत हे राजेश्री घरी येणार नाहीत असं समजून मी समाधानाचा निःश्वास टाकला. बर मी येण्याच्या आतच तो परत जाणार होता. म्हणजे यापुढें एकमेकाची गाठही पडणार नव्हती. अगदी नि.संकोच मनाने मी त्याला आलिंगन दिलं आणि मुक्तकंठानें संध्याकाळबद्दल आभार मानले. त्यानं बायकोचा निरोप घेतला आणि या वागणुकीत मला गैर काहीच दिसलं नाही. मला आणि बायकोला दोघानाहि या पार्टीबद्दल आनंद वाटला.

— २४ —

" यानंतर दोन दिवसानी शान्त अन्तःकरणाने मी बायकोचा निरोप घेतला व सुखानं परगावीं गेलों. माझ्याकरतां कामाचा रगाडा पडला होता. पण खेडेगावची राहणी, त्याची विचारसरणी मला नवीन जगात आल्यासारखं वाटे. साधारण दहा तासाप्रमाणें मी दोन दिवस कचेरीत काम केलें. आल्याच्या दुसऱ्याच दिवशीं मी कामांत गुंतलेलो असतांना पोस्टमननं बाय-

कोचं पत्र आणून दिलं. अगदी वेळ न गमावता मी तिथंच वाचून टाकलं. तिच्या चुलत्याबद्दल, नर्सबद्दल व मुलाच्या प्रकृतीबद्दल हकीगत तिनं लिहिली होती व शेवटी ताज्या कलमात गोविंदराव ठोंबे आले होते, पुन्हा प्रॅक्टिस करूं या—असं सांगत होते; पण मी ते नाकारलं. असं सहजगत्या लिहिलं होतं. आता तो पुन्हा परत घरीं जाईल अशी माझी समजूत नव्हती. उलट त्यानं कायमचा निरोप घेतला अशीच माझी समजूत झाली होती. त्यामुळे या बातमीमुळे मला वाईट वाटलं. त्यावेळी कामाची गर्दी असल्यामुळे मी पत्राचा विचारच केला नाहीं; पण परत बिऱ्हाडी गेल्यावर संध्याकाळी मी ते पत्र पुन्हा वाचलं. हे राजेश्री माझ्या गैरहजेरीत पुन्हा गेल्यामुळे मला त्या पत्राच एक कोडंच वाटूं लागलं. पुन्हा मत्सराचं भूत डोक्यात थैमान घालूं लागलं.

" तिनं लिहिलं यात गैर काय होतं! पण हा मत्सर माणसाला छळतोच ना! मी मनाशीं विचार केला. मी शांतपणे बिछान्यावर पडून दुसऱ्या दिवशीच्या कामाचा विचार करूं लागलो. नवीन जागेमुळे मला झोप लागत नव्हतीच पण त्या दिवशीं मात्र पाठ टेकताच डोळा लागला.

" अशा विचारतंद्रीत असताना मी खडबडून जागा झालों. जरा धक्का बसल्यासारखं झालं. तो, ती—व माझं तिच्यावर असलेलं प्रेम यानी डोक्यात गोंधळ माजवून सोडला. संतापानं बेभान होऊन मला त्यांची शिसारी वाटूं लागली, पण मी सदसद्विवेकबुद्धीला प्राधान्य देण्याचं ठरवलं.

" किती वेडगळ संशय! संशय घ्यायला जागा तरी आहे कां? उगीच बायकोला कमीपणा देण्यात काय अर्थ आहे? एकीकडे अब्रूचं-खोबरं केलेलं पेटीवर पोट भरणारा खुशालचेंडू तर दुसरीकडे चार लेकरं बाळ पदरी असलेली संसारी-सभ्य-लग्न झालेली माझी बायको—काय विपरीत कल्पना! ही विचाराची एक मालिका झाली. पण या विचाराला दुसरीही विरुद्ध बाजू होती! असं का होऊ नये! तरुण स्त्री-पुरुषांना एकान्त मिळाला असताना साहजिक त्याचा दुरुपयोग केला असेल हें स्पष्ट दिसत असताना ते खरं असेल असं समजणं यात कुतर्क कसला आहे. बोलून-चालून मुखवस्तू ब्रह्मचारी, त्यातून ध्येय-भ्रष्ट गोंडस तरुण आणि सुखोपभोग एवढंच आयुष्य तलं इति-कर्तव्य आणि दोघांना एकत्र आणणारं संगीत—पापी कामविकाराला चेतना देऊन सदसद्विवेकबुद्धीला जाळणारं आधुनिक शास्त्रच आहे. नीतिनियमाचं बंधन त्यांनी पाळण्याचं कारणच काय? कांही नाही. उलट त्याला मोहिनी पाडणाऱ्या गोष्टींचा गराडा त्याचे भोवती आहे. आता बायको म्हणजे तर मला एक कोडंच आहे. तिचा स्वभावच कळत नाही. निव्वळ लहरी आणि भावनाविवश जीव! भावनाप्रधान माणसावर कोणताच दाब राहणं कठीण आहे.

" आणि आता त्याचे दोघांचेही त्या रविवारचे चेहरे माझ्या मनःचक्षूसमोर उभे राहिले. मेघमल्हार संपल्याबरोबर त्यांनी एक पद वाजवलं; पण त्यात किती उत्तान-शृंगाराचं प्रदर्शन होतं हें माझ्या ध्यानात आलं. ' इकडं येऊन त्यांना

मोकळे सोडून केवढा गाढवपणा झाला,' असं माझ्या मनात आल. ' व्हायच्या त्या गोष्टी होऊन गेल्यात. आता एकमेकात आडपडदा शिल्लक नाहीं. झाल्या गोष्टीच्या विचारानं तिच्या चेहऱ्यावर थोडीशी शरमसुद्धा स्पष्ट दिसत नव्हती. का ? पेटी-जवळ जाताना दिसलेलं तिचं ते निस्तेज कोमल हास्य व लाजऱ्या चेहऱ्यावरनं घाम पुसण्याची ती मोहक पद्धत, माझ्या दृष्टीसमोर ते सार उभ राहिलं. एकमेकाची नजर ते टाळीतच होते फक्त जेवताना—तो तिला पाणी घालीत असताना त्यांनी एकमेकाकडे कटाक्ष टाकला आणि दुसऱ्याला नकळत ते हंसले. त्याचे त्यावेळचे चेहरे आणि ते निर्बल-हास्य मनात येताच मला धक्का बसला. ' व्हायचं ते दोघात होऊन गेलं ' एक आवाज कानात बोलला. काय वेड की काय ? असं होणंच शक्य नाही ' दुसरा आवाज बोलला. सभोवतालच्या अंधारात दैविक आणि भीतिग्रस्त विचाराला बळी पडेन असं वाटू लागल्यामुळे मी काडी ओढली, पण त्यामुळें भोवतालच्या पिवळया रंगाच्या भींतीने हे वातावरण जास्तच भयप्रद्र वाटू लागलं. आणि विचारतंद्रीत मनुष्य जसा सारखा सिगारेट ओढत बसतो, त्याप्रमाणे मीही विचार-द्वंदात गुरफटून गेलो, व त्यातून सुट-ण्याचा प्रयत्न करूं लागलो रात्रभर डोळ्याला डोळा नाहीं अशा परिस्थितीत पहाटे पाच वाजता मी मॅनेजरला हाक मारून टांगा बघण्यास सांगितलं. अशा ओढग्रस्त मनःस्थितीत यापेक्षा जास्त वेळ राहणं मला शक्य नव्हतं. हातातल्या कामाची कशीबशी व्यवस्था लावली आणि सकाळी आठ वाजता मी टांग्यांतून परत निघालों.

## — २५ —

तांबड फुटायला सुरवात झाली आणि आमच्या डब्यांतले दिवे विझवले गेले. भाऊसाहेब सुमंत मुकाट्यानं बसले होते. सारखं बोलून दमल्यासारखा दिसत होता व त्याला थाप लागली होती. खिडक्याची काचेची तावदानं करकरत होतीं, चाकाचा खडखडाट चालू होता व मुनिमाचं कंटाळवाणं धोरणं ऐकू येत होत. पहाटेच्या अंधारात त्याचा चेहरा स्पष्ट दिसत नव्हता; पण त्याचा दयार्द्र व क्रुद्ध आवाज मात्र ऐकू येत होता.

" तीस मैल टांग्यातून व आठ तास आगगाडीत काढणं मला भाग होतं. रस्त्यावरची घनदाट राई, धुक्यातून बाहेर पडणारा सूर्यप्रकाश, सकाळची थंड हवा, ह्यामुळं टांग्यातून प्रवास करणं फार सुखाचं होतं. धुकं नाहीसं होऊन सूर्यप्रकाश पडल्यानंतर मनाला मोकळं वाटूं लागलं. शेतात काम करणारी माणसं, रस्त्यानी जाणारी गुरंढोरं झाडावरच्या पक्ष्यांचा किलबिलाट, ह्यामुळं मी स्वतःला विसरून कुठं निघालो हेंच विसरलो. ज्या परिस्थितीच्या जाणीवेनं मी ह्या प्रवासाकरिता पाऊल टाकलं तो नुसता भ्रम असून मी सहज मजेत सहल करतो आहे असं वाटूं लागलं. अशा रीतीनें स्वतःला विसरण्यात गमत आहे. मी कशाकरिता बाहेर पडलो आहे, हें लक्षांत आलं की मी मनात म्हणत असे, ' उगीच भलती कल्पना नको. व्हावयाचं असेल तें होईल ! " निम्म्या

रस्त्यातच टांग्याची धाव निसटली आणि माझ्या विचाराला नवीनच गती मिळाली. ह्या खोळंब्यामुळे माझी मेल चुकणार, मला पॅसेंजर गाडीत जावं लागणार आणि पूर्वी जो मी संध्याकाळी पाच वाजता पोहचणार तो आता रात्री एक वाजता अवळीं घरी पोहचणार. ह्या दृष्टीने ह्या घटनेला महत्त्व होतं. कसेतरी संध्याकाळपर्यंत आम्ही लोहारपाटीला धाव बसवून घेतली. त्याचे पैसे चुकते केले, मध्यंतरी मी खानावळीत जेवण उरकून घेतलं आणि ह्यामुळे माझ्या विचारतंद्रीत खंड पडला. सर्व तयारी करून संध्याकाळी आम्ही पुढच्या प्रवासाला सुरवात केली. बीजेची कोर, निसर्गरम्य वातावरण आणि आनंदी ड्रायव्हर ह्यामुळं पुढं माझ्याकरिता काय वाढून ठेवलं ह्याचा चुकूनसुद्धा विचार येईना. का, पुढचं भवितव्य काय ह्याची कल्पना नसल्यामुळं मी सर्व सुखं भोगून घेत होतो, हेंच कळत नाही. भावनांच्यावर ताबा राहिल्यामुळे मिळणारी मनःशान्ती फक्त टांग्यातून प्रवास चालू होता तोंपर्यतच टिकली.

" आगगाडीत पाऊल टाकताच सर्व स्थिति एकदम पालटली. गाडीत ४॥ तास किती कष्टात गेले ते मी मरेपर्यंत विसरणार नाही. आता हा त्रास नेहमी आगगाडीच्या प्रवासानें सर्वांना होतो, तसा झाला. का घर जवळ येऊं लागले त्यामुळें आता काय तो सोक्षमोक्ष होणार या जाणिवेनें झाला, हे मला कांहींच समजेना. इतकं मात्र निश्चित की, मी डब्यात शिरता-क्षणींच माझा विचारशक्तीवरील ताबा सुटला आणि एकापेक्षा एक हिडीस विचार व कल्पना माझ्या मनःचक्षूपुढं धिंगाणा

ालूं लागल्या. माझ्या गैरहजेरीचा फायदा घेऊन ती दोघं कसं निर्लज्जपणानं वागत असतील, आणि माझी बायको कसं माझ्या तोंडाला काळं फासत आहे, यामुळे माझा राग वाढत चालला. संताप-द्वेष व काळोखीमुळे आलेला उन्माद यामुळे चित्रमालिकेतून मला सुटता येईना—पुसून टाकता येईनात किंवा मनात येऊंच द्यायची नाहीत इतकी शक्तीही राहीना. आणि जसजसा वेळ जाऊं लागला तसं तसं त्याच्या खरे-पणाबद्दल खात्री पटूं लागली. इतक्या जिवंत स्वरूपात मन चक्षूपुढं ही चित्रं नाचूं लागली की, त्यानीं वस्तुस्थिती-तील सत्य चित्राचं चित्रीकरणाचा भास होऊन माझ्या विवेक-बुद्धीचा ताबा घेऊन हे सर्व खरंच भासण्यास सुरवात झाली. माझ्या इच्छेविरुद्ध माझ्या डोक्यात सैतान ठाण माडून बसला व तो खोटा पुरावा देऊन भलत्या कल्पना आणि निरनिराळीं अनुमानं—आडाखे मला सुचवूं लागला. बरेच वर्षांपूर्वी माझें व गोविंदराव ढोबेच्या भावाचं बोलणं झालेलं मला आठवलं. आणि त्याचा संदर्भ या दोघानीं लावताच माझं काळीज फाटूं लागलं. फार वर्षांपूर्वी तुम्ही रात्री निराळ्या आक्षेपार्ह ठिकाणीं जातां का असं विचारल्याबरोबर त्यानी असं सांगितलं की, इतर सभ्य कुटुंबातून आपली शारीरिक गरज भागवणं सोपं जात असल्यामुळे तसं कारणच पडत नाही. आता त्याच्या भावानंच बायकोशीं संधान जोडलंय. 'छेः असं होणार नाही' मी मनात विचार करीत असे. असा कुतर्क मनात आणायचा काडीचा-सुद्धां आधार नाही. त्याच्याबद्दल मला मत्सर वाटणं यातच तिल

अपमान वाटतो असं तिनं शपथेवर सांगितलं. हो ! पण तिनं खोटं कशावरून सांगितल नसेल. खोटंच असणार, खोटं बोलण्याची संवयच आहे " पुन्हा विचाराला गती मिळाली. डब्यात फक्त एक म्हातार जोडपं होतं. ते अगदी अबोल लोक दिसले, पण तेही थोड्या वेळानं उतरून गेले आणि डब्यात मी एकटाच राहिलो. पिंजऱ्यातल्या हिंस्र-पशूसारखी माझी स्थिति झाली. एकदा खिडकीकडंच धाव घे, तर एकदा डब्यातच शतपावली घाल. जणू काय डब्यात चालल्यानं मी आधीच पोंचणार आहे. डब्याच्या खिडक्या सारख्या हदरत होत्या.

यावेळी भाऊसाहेब सुमंतानीं डब्यात जरा पाय मोकळे केले आणि पुन्हा आपल्या जागेवर बसून पुढे सुरुवात केली.

" या आगगाडीच्या डब्याचा धसकाच बसलाय मला. मी मनात म्हणे, आता दुसरा विचार करूं या. आपला दोन प्रहरचा खानावळवाला आणि माझ्या मनःचक्षूंपुढें तो म्हातारा आणि त्याचा नातू येई. त्या मुलाचं आणि माझ्या मुलीचं वय सारखंच दिसलं. अरेरे ! मुलीच्या समोर याच्या प्रेमचेष्टा चालणार. एकमेकांची आलिंगनं आणि मुके—पोराच्या मनात काय येईल. पण याना काय पर्वा असणार—प्रेम आहे.' पुन्हा सर्व विचार सुरू होई. " काल दवाखान्यांत रोग्याची डॉक्टरविरुद्ध तक्रार होती. डॉक्टरच्या मिशा गोविंदरावा-सारख्याच होत्या नाही ? किती बेशरमपणानें आणि निर्लज्ज-पणानें ते--दोघंही—माझ्या डोळ्यात धूळ टाकताहेत. परवां गावाला जायचंय असं तो म्हणत होता ! पुन्हा बुद्धीला शीण

करणारी विचार-मालिका चालूं झाली. कोणतीही गोष्ट मनांत आली तरी तिचा संबंध याच्यापर्यंत येऊन भिडूं लागला व त्यामुळें मला भलताच त्रास होऊं लागला. हिच्यावर दया दाखवून प्रेम करावं की हिचा द्वेषच करणं योग्य. याबद्दल अज्ञान, शंका, विचाराची धरसोड यामुळें ठाम मत होईना म्हणून-दु:ख वाटूं लागलं. या अन्त:करणाच्या टोचण्या तीव्र वाटूं लागल्या कीं, सरळ रुळावर पडून आत्महत्येत निकाल लावावा असा विचार आला; पण तिच्याबद्दलची तीव्र सूडबुद्धि व स्वत:बद्दल माया यामुळे तो विचार तितकाच राहिला. झालेल्या अपमानामुळे व त्यानं संधी साधल्यामुळे त्याचा मला राग येतच होता; पण तिच्याबद्दल चीड व द्वेष भलताच होता. 'स्वत:च्या जीवाला धोका करून तिला मागे ठेवण्यात काय पुरुषार्थ आहे. माझ्याबरोबर तिलाहि भोगलंच पाहिजे, म्हणजे माझ्या दु:खाची तिला जाणीव होईल' मी मनात विचार केला.

"उगीच मनाची करमणूक म्हणून मी प्रत्येक स्टेशनवर गाडी थाबली कीं, उतरत होतो. एका स्टेशनवर दुकाना-भोवती जरा गर्दी दिसली म्हणून तिथं गेलो आणि सरळ एक ग्लास दारू रिझवली. शेजारीच एक गुजराथी गृहस्थ होता. त्याच्याशी बोलत—उगीच डब्यांत एकट्यालाच कंटाळवाणं नको म्हणून मी थर्डक्लासमध्ये जाऊन बसलो. डबा सिगरेटच्या धुरानं भरून गेला होता आणि खाली शेंगाची फोलकटं आणि पानाच्या पिचकाऱ्यानी घाण झाली होती. तो गृहस्थ पुष्कळ

कुळकथा सांगत होता, पण माझ्या विचारतंद्रीत मी गुरफट-ल्यामुळे मला तें ऐकूंही येत नव्हतं व समजतही नव्हतं. हें त्याच्या लक्षात आल्यामुळें हे राजेश्री लगट करून माझं मन वेधूं लागले. त्याबरोबर मी ती जागा सोडून सरळ स्वतःच्या डब्यात गेलों. ' आता शान्त चित्तानं सर्व बाजूंनी विचार करून यात त्रास करून घेण्यासारखं काही आहे का ' या विचारान मी बसलो, पण ' निर्मळ मनानं, तर्कशुद्ध विचार येण्याऐवजी पूर्वीचीच विचारचक्रं-तीच कारणमीमासा व तेच देखावे, डोक्यात थैमान घालूं लागले.

" काहीं तरी कुतर्क काढून मी आतापर्यंत स्वतःला काय थोडा त्रास करून घेतलाय. ( या वेळीं माझ्या मनात पूर्वी उगीच मत्सरामुळे डोक्यात आलेलं वेड आठवलं )—शंका घ्यायला काही तरी जागा होती का ? आताही तसंच असेल. बिचारी शान्त चित्तानं झोपली असेल. तिच्या चेहऱ्यांत—वागणुकीतसुद्धा काही आढळणार नाही. मग उगीच कल्पनेचे खेळ--पराचा कावळा करण्यात काय अर्थ आहे. असं असेल तर काय आनंद वाटेल मला ! ' ' पण छे ! आता बराच वेळ झालंय. आता उलटच असणार ! उगीच मनात कुतर्क येई, आणि मग एकापेक्षा एक विचार माझं अन्तःकरण कापीतच गेले. खरोखरीच यमयातना होत होत्या. दुष्कृत्याचे परिणाम ठसवण्याकरतां तुम्हाला दवाखान्यातच जायला नको—नुसतं माझ्या अंतःकरणाच्या उडालेल्या चिंधड्याकडे लक्ष टाका, कीं सर्व तुमच्या लक्षांत येईल. माझ्या बायकोवर सर्वस्वी विश्वास हवा—

ती आणि मी एकजीव—असं असूनसुद्धा तिच्यावर आपला ताबा नाही. ती आपली नव्हे. तिच्या मतांप्रमाणें ती वागणार—आणि माझ्या नाकावर टिच्चून बेपर्वाइनं वागणार—ही कल्पनाच भयंकर होती. त्याला कांहींच हरकत घेतां येत नव्हती, तर हिला बोट लावायचीसुद्धा सोय नाही. तिचा अधःपात झाला नसला, पण वाकडं पाऊल पडण्याचा बेतात असलं—बाकी माझ्या डोळ्यात धूळ टाकण्याचा तिचा निश्चयच दिसतोय—तर मात्र ही परिस्थिति फारच वाईट. यापेक्षा उघड व्यभिचार पत्करला म्हणजे मला पुढचा विचार करायला बरे! निदान शंका-कुशंका आणि तर्कवितर्क तरी नकोत. मला काय—कसं पाहिजे. माझी काय अपेक्षा—याबद्दल ठाम मतच होईना तो नुसता मूर्खपणाचा बाजार होता!"

## — २६ —

"एकच स्टेशन राहिलं आणि तिकीट-कलेक्टर डब्यात येऊन तिकिटं गोळा करूं लागला. मी उतरण्याच्या तयारीनं माझं सर्व सामान एकत्र जमा केलं व ब्रेकजवळ जाऊन माल चढवीत होते ते पाहात उभा राहिलो. आता काय तो निकाल लागणार, या जाणिवेने मला जास्तच गरम वाटूं लागलं. थंडीचा कडाका भासूं लागला व दातखिळी वाजूं लागली. गाडी योग्य वेळीं पोंहोचली आणि इतराप्रमाणें मी गर्दीतून वाट काढीत टांगा पाहिला आणि घरचा मार्ग धरला. रस्त्यावर क्वचित लोक दिसत होते. कांहीं हॉटेलं उघडी होतीं. घराच्या

व वाहनाच्या हलत्या सावल्या दिसत होत्या; पण माझ्या मनांत कोणताच विचार नव्हता. स्टेशनपासून अर्धा मैल आलो असेल नसेन, इतक्यात माझे पाय गार वाटू लागले. मी डब्यातच पायमोजे काढून बॅगमध्यें ठेवलेले लक्षात आलं. माझी बॅग टांग्यात होती, पण ट्रंक कुठं आहे? हो ट्रंक आणि वळकटी ब्रेकमध्यें टाकली होती; पण रिसिट माझेजवळच होती आणि सामानाकरतां परत जाणं तर इष्ट वाटेना म्हणून मी तसाच पुढे चाललो. टांग्यातून स्टेशनपासून घरी जाईपर्यंत माझ्या डोक्यात काय विचार चालले होते याचं मला केव्हाच स्मरण झालेलं नाही. अन्तःकरण अगदी शून्य आहे.

" आयुष्यातील अत्यंत महत्त्वाची काहीतरी घटना घडणार आणि त्याबद्दल काहीतरी भयंकर विचार माझ्या मनात घोळत होते. इतकंच मला आठवतं. माझ्या विचारामुळे ती महत्वाची घटना घडत होती, का हें नुसतं भाकीत होतं हें काही सागता येत नाहीं. जें पुढं घडलं त्याच्या आधीचे काही क्षण माझ्या अन्तःकरणावर भीषण छटा पसरली गेली असं मला झालं असावं

" शेवटीं एकदाचं घर आलं. रात्री एकचा सुमार झाला असेल. दरवाज्यात काही टांगेवाले भाडें घेण्याकरता थाबलेले दिसले. इमारतीच्या काहीं खिडक्यातून अंधुक प्रकाश दिसत होता. ( आमच्या दिवाणखान्यात व माजघरांत मात्र विजेचा लखलखाट दिसत होता. ) इतक्या अपरात्री आपल्या खोलीत उजेड कसा? याचा विचारसुद्धा न करता मी दरवाजा गांठला.

प्रत्येक पावलागणिक कांहीतरी भयंकर दृश्य दिसणार या अपेक्षेतच मी दरवाजाच्या घंटेवर बोट ठेवलं. आमचा नोकर– कष्टाळू पण मूर्खच त्यानं दरवाजा उघडला. व्हरांड्यात इतर कपड्याबरोबरच ओव्हरकोट असल्याचं माझ्या ध्यानात आलं. मला धक्का बसला नाही अगर आश्चर्य वाटलं नाहीं; कारण असं असणार हे मी समजूनच होतो. ' आपल्या कल्पनेप्रमाणं बरोबर जमलं ' असा विचार करीत मी नोकराला घरी कोण आहे अस विचारताच त्यानं त्याचंच नाव घेतलं. याच्या-शिवाय आणखी कोणी आहे का, याची चौकशी करताच त्यानं नकारात्मक उत्तर दिलं. त्यावेळचा त्याचा आवाज अजून माझ्या कानात आहे. दुसरं–तिसरं कोणी नसून तोच आहे, हे पटवण्याचा त्याचा हेतु दिसला. ' अस्सं ! ' मी स्वतःशीच मोठ्यादा म्हणालो. ' बरं मुलं ? ' मुलं परमेश्वर-कृपेनें सुखरूप आहेत बराच वेळ झाला, ती झोपलीत. ' माझी दांतखिळ थांबेना आणि श्वास कोंडल्यासारखं वाटूं लागलं. ' एकंदरींत माझ्या कल्पनेबाहेर या थराला गोष्टी गेल्यात तर, ' मी मनाशींच म्हणालो, पूर्वी मी काहीतरी दुर्दैवी कुतर्क काढून घरीं यायचं–माझी चूक मला पटायची–सारं व्यवस्थेशीर असायचं ! आतां तसं नसून माझ्या कल्पनेतले कुतर्क खोटे नसून अगदीं सत्य–स्वरुपात घरात धिंगाणा घालीत आहेत आणि त्याचेशी माझी आता गाठ आहे.

" मला अगदी हुंदका फुटण्याच्या बेतांत होता, पण इत-क्यांत माझ्या डोक्यात सैतान शिरून शिकवूं लागला कीं,

वेड्या असं मुळूमुळू रडण्यात आणि मृदू भावनेच्या आधीन होण्यात काय अर्थ आहे? यामुळें त्या दोघानाही स्वतःच्या पापावर पांघरूण घालायला अवसर मिळेल आणि तूं मात्र जन्मभर शंकाकुशंका आणि दुःख करीत खिचपत पडणार! या विचाराबरोबर माझ्यातला कोमलपणा नी सगळे सात्विक गुण संपले आणि निराळ्याच भावनेचा पगडा माझ्यावर बसला. तुम्हाला आश्चर्य वाटेल, पण आता आपला त्रास संपला. तिचं माप पदरात घालून तिला शिक्षा करतां येईल, घालून देता येईल—सूड घेऊन समाधान लाभेल असा आनंद वाटूं लागला. जसा जसा मी संतापाच्या आणि सूडाच्या आधीन होऊं लागलो, तसतशी माझ्यातली माणुसकी नष्ट होऊन—मी एक रानटी, क्रूर, धोकेबाज व दीर्घद्वेषी जनावर बनलो. नोकर हॉलमध्ये जाणार इतक्यात मी त्याला थांबवलं आणि हातात पावती देऊन वेळ न गमावता स्टेशनवरून माझं सामान आणण्यास सांगितलं. कपडे करण्याकरता तो आपल्या खोलीत गेला; पण याच्या चाहूलीनं ही जोडी सावध होईल म्हणून मी दाराबाहेर थांबलो. एकाच खोलीचं मध्यें अन्तर असताना जेवतानाचा त्यांचा बोलण्याचा आवाज अस्पष्ट कानी पडत होता. बहुतेक जेवण्याचा नादात त्यांनीं घंटेचा आवाज ऐकलाच नव्हता. 'परमेश्वरा! त्यांना आता खोलीबाहेर पडण्याची बुद्धी देऊं नकोस' मी मनात उद्गारलो. नोकरानं कपडे केले आणि तो निघून गेला. आतां आपण एकटेच आहोंत व आपलं काम लवकर उरकलं पाहिजे. या

जाणीवेने मला कापरं भरलं, पण काय करायचें तें कोठं ठरलं होतं? तिचा नीचपणा पुरेपूर पटला होता. त्याबद्दल तिला शासन करायचं आणि आपला संबंध तोडायचा. आतापर्यंत माझा गैरसमज झाला असेल, उगीच कुतर्क केले असतील, पण आता सर्व वर्तनाचा आरसा दिसत असून आता कच घेणं शक्य नव्हतं माझ्या गैरहजेरीत अपरात्री त्याचेशी एकान्त काय!" बेशरम वागणूकीचा आणखी पुरावा तो कसला सगळ्यात वाईट म्हणजे 'पूर्ण विचाराअन्ती त्यानीं हा निर्लज्ज-उद्धटपणा पत्करलेला दिसतो.

आता सर्व गोष्टी स्पष्ट कळल्या. संशय म्हणून कोणताच राहिला नाहीं. त्यात पळायला संधी मिळू नये. उगीच मला फसवून गोंधळात टाकायला, निमित्त शोधायला वेळ मिळू नये, नाहीतर त्याच्या पापाचं माप पदरात टाकायचा हा सारा बेत फसणार, एवढीच रुखरुख मनाला लागली.

बिलकूल वेळ न घालवता, समोरून न जाता मुद्दाम मुलाच्या खोलीतून अगदी हलक्या पावलानीं मी ते होते त्या खोलीकडे चाललो. पहिल्या खोलींत मुलं अगदी शान्त झोप लेली होती. जवळच्या दुसऱ्या खोलीत नर्स झोपली होती. तिनं जरा चुळबूळ केली, मला वाटलं आता ती उठणार. त्याच वेळी घरात चाललेला प्रकार तिला समजला तर तिला काय वाटेल? याची स्पष्ट कल्पना मनात आलीं. स्वतःबद्दल इतकी दारुण निराशा वाटली की, मला रडूं थांबवेना. उगीच

मुलाची झोंपमोड होईल म्हणून तसाच मी परत फिरलो व माझ्या खोलीत जाताच मला कोण हुंदका फुटला.

' घराण्याचा लौकिक किती मोठा—किती ::: ···णानें कुटुंबाच्या सुखाकरतां मी झटलों. किती निष्ठेनं मी तिच्याशी वागलो आणि आज माझ्या नशिबीं काय पाहण्याचं आलं. चार लेकरं बाळं झालेली ही बाई, त्या खुशालचेंडूच्या बाहूपाशात पडते; कारण काय, तर देखणा—छटेल म्हणून हिच्यांत माणुसकी तरी आहे का! आणि हे सारे प्रकार पोरांच्या शजारच्या खोलीत—याच मुलावर प्रेम असल्याचं ढोंग तिनं आतापर्यंत केलं मला पत्रसुद्धा कसं खुबीनं लिहिल. बाकी किती दिवस हे प्रकार चालू आहेत हें तरी काय कळणार. आज रात्री येण्याच्या ऐवजी जर मी उद्या आलो असतो, तर दरवाजात काय आली असती, नखरा काय केला असता, कांहीं थागपत्ता लागूं दिला नसतां! शेवटपर्यंत द्वेषानं माझ्या अन्तःकरणाच्या चिंधड्या उडत राहिल्या असत्या. नर्सला काय वाटेल? नोकर काय कल्पना करील? शिवाय मोठी मुलगी ( तिचं आतां समजण्याइतकं वय आहे ) किती निर्लज्जपणा! काय ढोंग! मी मनात म्हणालों.

" उठायची ताकदच माझ्या पायांत राहिली नाहीं. सारखं काळीज धडधडूं लागलं आणि उठलों की, चक्कर येऊन पडेन असं वाटू लागलं. तिचा खूनसुद्धा करायला मागंपुढं पाहणार नाहीं. मी मेलों तर तिला तेच पाहिजे आहे दैवाची खैरच झाली असं म्हणणार! मी इथंच खोलीत बसलों आणि तिकडे

त्यांची खाण्यापिण्याची मजा लुटण्याची चंगळ चालली आहे. त्याच दिवशी तिचा गळा दाबून मी मोकळा झालो असतो तर? एक आठवड्यापूर्वी मी खोलीत सामान भिरकावलं व तिला खोलीतून घालवून दिलं, तो प्रसंग मला आठवला. त्या प्रसंगाची नुसती मला आठवणच झाली नाही, तर त्या दिवसाप्रमाणे मारावं—तिचं पारिपत्य करावं अशी इच्छा बळावूं लागली. सूड घेण्याच्या कल्पनेनं मला सर्व जगाचा विसर पडला. एकादं क्रूर जनावर अगर संकटानं त्रस्त झालेला माणूस ज्याप्रमाणे योग्य वेळी, पण क्षणाचाही विलंब न करता ज्या मनःस्थितीत सर्व कार्य उरकतो, तशीच माझी स्थिति झाली. सूड-बुद्धीनं माझं अन्तःकरण जळूं लागलें.

## — २७ —

"प्रथम मी पायातला बूट काढला आणि मोकळ्या पावलानीं जाऊन—तीक्ष्ण धारेची कट्यार घेतली. ती म्यानातून काढताच म्यान माझ्या हातून खाली पडलं 'पुन्हा हुडकू' असं म्हणालेलं मला पुरं आठवतं. अंगावरचा ओव्हरकोट काढून टाकला आणि चोरट्या पावलानीं मी जाऊन खाड दिशी खोलीचा दरवाजा उघडला."

"त्यावेळचे त्या दोघांचेही चेहरे मला पूर्ण आठवताहेत. त्याचे हाल करण्यात मला समाधान वाटत होतं. माझ्या कल्पनेप्रमाणें त्याचे चेहरे भीतिनं पांढरे फटफटीत पडले. मला पाहताक्षणींच त्याच्या चेहऱ्यांवर जे भीतीचं नी निराशेचं

वातावरण पसरलं, तं मी मरेपर्यंत विसरणं शक्य नाही. प्रथम तो टेबलाजवळ होता; पण मला पहाताच चमकला नी कपाटाला टेकून उभा राहिला. त्याच्या चेहऱ्यावर भीति अगदी स्पष्ट दिसत होती, निदान मला तरी तसं वाटलं. तिचा चेहरा घाबरलेला तर होताच; पण याशिवाय ज्या इतर भावना मला दिसल्या, त्या नसत्या तर कदाचित माझ्या हातून वेडंवाकडं काही घडलं नसतं; पण एकमेकाच्या सहवास-सुखात आलेल्या व्यत्ययाची चीड आणि निराशा याची चमक तिच्या डोळ्यात दिसली. आपल्या सुखात कोणताच व्यत्यय येऊं नये अशी एकच इच्छा—एकच विचार दिसला. एक क्षणभरच या भावना दिसल्या असतील, इतक्यात त्यानं तिच्याकडे प्रश्नार्थक मुद्रेनं पाहिले. 'ह्या ं हे बोलून भागेल का? मग सुरुवात केलेली बरी नाहीतर काही तरी भलतंच होणार. पण काय होणार? त्याच्या मुद्रेंत हा भाव दिसला. त्याची आणि तिची दृष्टादृष्ट होताच तिच्या चेहऱ्यावरील निराशा आणि चीड याची जागा—त्याच्या-बद्दलच्या सुरक्षिततेच्या काळजीनं घेतली असं मला वाटलं. एक क्षणभर मी पाठीशी खंजीर लपवून दारात उभा होतो. इतक्यात निर्विकार चेहऱ्यानं त्यान सुरुवात केली. आम्ही प्रॅक्टिस करीत होतो.' हे सारंच हास्यास्पद होत.

"तुम्ही आलात. किती आश्चर्य!" त्याची री ओढण्याकरता तिनं सुरुवात केली.

पण दोघानाही वाक्य पुरं करायला फुरसदच मिळाली नाही. एक आठवड्यापूर्वी ज्याप्रमाणे तोडावं—मोडावं असं

वाटलं, तशी वेडाची लहर पुन्हा मला आली आणि तिच्या मी पूर्ण आहारी गेलो.

"त्याना काय सांगायचं होतं ते बोलायला त्याना कधीं अवसरच मिळाला नाही. दुसरी गोष्ट ते ज्याला भीत होते ती आकस्मिक घडली—की त्याची बोबडीच वळली. हातातला खंजीर पाठीशी लपवीत मी एकदम तिच्यावर तुटून पडलो. तो मध्यें पडून व्यत्यय आणील असं मला वाटत होतं, नेमकं छातीच्या खाली मी वार केला ( फार दिवसापासून ही जागा मी हेरून ठेवली होती. ) मी झडप घालणार इतक्यात मी काय करतोय हे त्याच्या लक्षात आलं. त्यानं माझा हात पकडला—( त्याच्या या वागणुकीचं मला आश्चर्य वाटलं )— आणि तो जोरात ओरडला 'संभाळ ! काय करतोस याचा विचार कर ! धावा ! धावा !'

"मी माझा हात सोडवून घेऊन त्याच्याकडेच एक शब्द न बोलता चवताळून धावलो, पण माझी दृष्टादृष्ट होताच तो पांढरा फटफटीत पडला. चेहऱ्यामध्ये रक्ताचा टिपूस दिसेना. डोळ्यांत नेहमींची चमक दिसेना. तो चटकन् टेबलाखाली लपला आणि खोलीतून बाहेर पळाला, याचंच मला आश्चर्य वाटलं.

"मी त्याच्या मागोमाग धावलो, पण माझ्या डाव्या हातावर भार पडल्यासारखं वाटलं. तिनं माझा हात धरला होता—मी मोकळा होण्याकरता धडपडलों; पण तिनं जास्तच बळकट धरून मला जागचं हालूं दिलं नाहीं. हे मध्यं-

तरीचं अनपेक्षित संकट-तिचा कंटाळवाणा स्पर्श-यानं मला जास्त चेव आला. मी संतापानं लाल झालों होतो आणि आता हिच्या चांगलीच अद्दल घडवतो या विचारानंच मला आनंद झाला.

"डाव्या हातानं तिला मागं रेटून तिच्या तोंडावर मी जोरानं ठोसा हाणला. ती जोरात ओरडली आणि तिची माझ्या हातावरची मिठी सुटली.

"मी त्याच्या मागोमागं धावणार होतो, पण मोकळ्या पायानं बायकोच्या जारा मागं धावणं म्हणजे जगात हसं होणार ! मला तर हास्यस्पद व्हायचं नव्हतंच. पण माझं रौद्ररूप दाखवायचं होतं. मी रागानं बेभान असलों तरी माझा दुसऱ्यावर होणारा परिणाम जाणत होतो. कित्येक वेळा या दुसऱ्यावर होणाऱ्या परिणामानंच मला माझा मार्ग दाखवला.

"मग मी तिचा समाचार घ्यायला तिच्याकडे वळलो. त्यावेळी स्वतःच्या ठेंचल्या गेलेल्या तोंडाला चोळत ती माझ्याकडेच पहात होती. तिच्या चेहऱ्यावर भीती आणि डोक्यात माझ्याबद्दलचा द्वेष पूर्ण दिसत होता. उंदीर पिंजऱ्यात पकडून उजेडात धरला म्हणजे जसं दृश्य दिसेल तसंच हें दृश्य होतं. दुसऱ्यावर जडलेल्या प्रेमामुळेच माझ्याबद्दल भीति आणि द्वेष आहे हें माझ्या ध्यानात आलें. इतकं असूनसुद्धा ती जर गप्प बसली असती, तर माझ्या हातून अत्याचार घडला नसता.

"पण एकदम तिनं माझ्या ज्या हातात खंजीर होता, त्या हाताला झोंबायला आणि बोलायला सुरवात केली.'

" काय करताहात याचा जरा विचार करा! त्याच्या माझ्यांत तसलं काही घडलं नाही. शपथपूर्वक काहीही झालं नाही,' तरीही मी गप्प राहिलो असतो; पण शेवटच्या वाक्यात माझी खात्री पटली की, हे सारं खोटं सांगणं आहे. सगळे व्यवहार झालेत. आता माझ्या चढत्या रागाला साजेसं आणि माझ्या अन्तःकरणाची बेभान स्थिति व्यक्त करणारं उत्तर तर दिलं गेलं पाहिजे. मनाच्या इतर अवस्थेप्रमाणें संतापाला काही तरी मर्यादा आहेच!

" खोटं बोलूं नकोस सटवे!' मी डाव्या हातानं तिला पकडत ओरडलो. तिनं चटकन् आपली मुटका करून घेतली. नंतर खंजीर मुठींत घट्ट पकडून डाव्या हातानं मी तिचं नरडं पकडल आणि जमिनीवर उताणं पाडून तिचा गळा दाबूं लागलो काय निबर होती तिची मान! तिनं दोन्ही हातानी गळा सोडविण्याचा प्रयत्न केला, पण त्याच वेळी डाव्या बरगडीत मी सर्व शक्ती एकवटून खंजीर खुपसला.

' वेडाच्या लहरीत आपण काय करतोय याचं भान माणसास राहत नाही. असं जेव्हा लोक बोलतात, त्या वेळी ते खोटें तरी असलं पाहिजे किंवा तो मूर्खपणा तरी असला पाहिजे. मी काय करतोय याची मला पूर्ण जाणीव होती. एकक्षणभरसुद्धा मला त्याचा विसर पडला नाही. संतापाच्या वाढीबरोबरच माझ्या कृत्याच्या जबाबदारीची जाणीव मला होतच होती. माझ्या हातून काय होणार याची आधीं मला कल्पना होती. असा माझा आग्रह नाहीं; पण खून होताना अगर त्याचेपूर्वं

काही क्षण मला त्याची जाणाव होती. योग्य वेळी पश्चातापाला अगर माघारीला सबब देण्याला हा अवसर व जाणीव पुरेशी होती. आपण खंजीर खुपसतो आहोत व यानं ही मरणार याची मला जाणीव होती पूर्वी कधीही आपल्या हातून न घडलेले काहीं तरी भयंकर आपण करतो आहोत व याचं नुकसान आपणास सोसावं लागणार हे मला कळत होतं. वीजेसारखी या जाणिवेची कल्पना आली आणि लागलीच माझ्या हातून खून झाला किंबहुना दोन्ही गोष्टी एकदमच घडल्या. या कृत्याची जाणीव आणि भयंकरपणा मला स्पष्ट दिसत होता. तिच्या पदरातून, पोलक्यातून तिचं शरीर कापीत गेलेला खंजीर आणि ती परिस्थिति—याची मला पूर्ण आठवण आहे. दोन्ही हातांनीं तिनं खंजीर पकडला. हातातून रक्त वाहूं लागलं. पण खंजीरानं आपलं कार्य केलंच.

"तुरुंगात, माझ्यात नैतिक क्रांति झाली होती. माझ्यात मूलभूत बदल झाला. त्या दुर्दैवी घटनेच्या वेळी माझे विचार आणि भावना काय होत्या याबाबद विचार करीत मी तासान् तास बसत असे. माझ्या हातून हें कृत्य घडण्यापूर्वी एकच क्षण आपल्या हातून खून होतो आहे एका असहाय्य स्त्रीचा. प्रत्यक्ष बायकोचा खून झाला आहे हे ओळखलं. या विचारानं मला किती धक्का बसला आणि ताबडतोब खुपसलेला खंजीर मी बाहेर उपसून घेतला. हेतु हा की. झालेल्या कृत्याचं तितकंच परिमार्जन! मी निश्चल उभा राहिलों. काय होतंय ते पाहिलं. झालेली चूक दुरुस्त करतां येईल कां याचा विचार करीत थांबलों."

" ती ताडकन् पायावर उभी राहिली आणि ओरडली. 'नर्स–यानी माझा खून केला!' ती बडबड ऐकून नर्स दरवाजात आलीच होती. मी अगदी हालचाल न करतां आशाळभूताप्रमाणे उभा होतो. एकदम तिच्या पोलक्यातून रक्ताची चिळकांडी उडाली."

" आता उपचाराच्या पलीकडे परिस्थिति झाली आहे–आणि आता दुरुस्ती करण्यात अर्थ नाही–हे ताबडतोब माझ्या ध्यानात आलं. असंच वागण्याची माझी इच्छा होती आणि तसं वागण्याशिवाय गत्यंतरही नव्हतं 'अरे देवा!' असं म्हणत नर्स तिच्या मदतीकरता धावली.. ती जमिनीवर पडेपर्यंत मी तेथे थाबलो; पण नंतर मात्र हातातला खंजीर फेंकून देऊन, मी खोलीतून चालता झालो. 'उगीच त्रागा करण्यात अर्थ नाही मी काय करतोंय याचा विचार केला पाहिजे.' नर्सकडे अगर बायकोकडे लक्ष न देता मी मनाशीच पुटपुटत होतो.

" नर्सनें रडायला सुरवात केली व मोलकरणीस हाक मारली.

" मी व्हराड्यातून जाऊन मोलकरणीला मालकिणीकडे पाठवलं आणि माझ्या खोलीत गेलो 'आता काय करावं' मी मनाशीं विचार करताच उत्तर ठरविलं. मी कपाटातून माझा भरलेला पिस्तूल काढला आणि टेबलावर ठेवला. नंतर म्यान उचललं आणि कोचावर बसलो. कोणताही विचार न करतां अगर कसलंही स्मरण न करता असाच मी बराच वेळ बसलो. बाजूच्या खोलीत बरीच गडबड चालल्याची मला मात्र

पूर्ण जाणीव होती, एका मागोमाग एक अशा दोन गाड्या येऊन दरवाजाशीं थांबल्याचं माझ्या कानीं पडलं. नोकरानीं स्टेशनवरचं सामान आणून खोलीत ठेवलं, जसं कांही आतां मला त्याची गरजच होती. काय झालं ते कळलं ना? जा पोलीसाना वर्दी दे, मी त्याला सागितलं.

काहीच उत्तर न देता तो निघून गेला. मी कोचावरून उठून सिगारेट ओढून संपण्यापूर्वीच मला सुस्ती वाटूं लागली आणि झोंप लागली.

" मी दोन तास झोंपलो होतो. आम्ही दोघं अगदी प्रेमानं राहात आहोत. थोडं भांडण झालं असेल व काही किरकोळ अडचण असली तरी भांडण मिटलं आहे आणि एकंदरीत एकमेकाच्या अन्तःकरणात एकमेकाचा ओढा आहे असं मला स्वप्न पडलं.

" दरवाज्यावरच्या थापेनें मी जागा झालो

" बहुतेक हे पोलिसच असणार " मी विचार केला. माझ्या हातानं तिचा खून झाला म्हणायचा. कदाचित् ती स्वतःच दारावर धक्के देत असेल. आणि तसं कांहींच घडलं नसेल ' दरवाजावर धक्के मारणं चालूंच होतं; पण तिकडे लक्ष न देता हे खरं घडलं की नाहीं याचाच मी विचार करीत होतो हो! गोष्ट घडली खरी. खंजीराचं तीक्ष्ण पातं तिच्या छातीत खुपसल्याचं आठवलं आणि माझ्या छातींत कळ आली—रक्त गोठूं लागलें.

" एकंदरीत ही गोष्ट घडली यात संशय नाहीं. आतां आपली पाळी आली आहे. मी आत्महत्या करण्याचं ठरवलं; पण हा विचार मनात असतांनाच हें आपल्या हातून होणार नाही हे मी जाणून होतो. इतकं असतांनासुद्धा मी उठून पिस्तूल हातात घेतलं. याच्यापूर्वी कितीतरी वेळा मी आत्महत्त्या करण्याच्या बेतात होतो नी काल आगगाडीत तोच विचार डोक्यात घुमत होता, याचंच आश्चर्य वाटलं. आत्महत्त्या म्हणजे अगदीं क्षुल्लक बाब वाटत असे मला. कारण माझी आत्महत्त्या तिला धडकी भरायला एक सोपं साधन आहे असं मी मानीत होतो. आता आत्महत्त्या करण्याचं तर सोडाच पण तो नुसता विचारसुद्धा मला पटत नव्हता 'मीं आत्महत्त्या का करावी? या प्रश्नाचं मला उत्तरच मिळत नव्हतं. दरवाज्यावरच्या धक्क्यांत खंड नव्हता. ' प्रथम कोण आलंय ते पाहू या! आत्महत्त्या काय केव्हाही करता येईल?' अशा विचारात मी पिस्तूल टेबलावर ठेवून त्याचेवर एक वर्तमानपत्र झाकलं. नंतर दरवाजा उघडून पहातों तों मल्या अन्तःकरणाची मूर्त विधवा-( बोडकी )-मेव्हणी हजर होती.

" काय झालं हें?" इतकं बोलून तिनं रडायलाच सुरवात केली. तिचं रडं नेहमींच हुकमी असे!

"' काय काम आहे' मी जरा तुटकपणानं विचारलं मला तिच्याशी उर्मटपणानं वागण्याचं काहींच कारण नव्हतं. पण त्याशिवाय मलाही गत्यंतरच नव्हतं!

"' अरे! ती आतां मरते आहे. डॉक्टरनींसुद्धां असंच सांगितलं.-हेच तिचे नेहमीचे डॉक्टर आणि सल्लागार.

म्हणजे राजेश्री आलेंत काय!' मी चौकशी केली आणि माझा तिच्याबद्दलचा द्वेषाग्नि पुन्हा भडकला.

'मग! मरत असेल' मी पुढें सुरवात केली.

'निदान जवळ तरी जा; काय भयंकर दृश्य आहे!' एक निश्वास सोडून ती म्हणाली.

"मी तिच्याकडं जायला पाहिजे?" मी मनाशी विचार केला. आणि एकदम ठाम निश्चय झाला की जाणं आपलं कर्तव्य आहे; यावेळी असंच वागणं बरोबर आहे. ज्यावेळी माझ्याप्रमाणे नवऱ्याच्या हातून बायकोचा खून होतो, त्यावेळीं त्यानं तिच्याकडे जाणं भाग आहे, असंच जर नेहमी होत असेल तर मी जाणं योग्य आहे, असा विचार मी केला. जर गरजच भासली तर आत्महत्त्या करायला पाहिजे तितका अवधि आहे, असा विचार करीत मी मेव्हणीच्या पाठोपाठ गेलो. आता वाटेल तें ऐकून घेण्याची आणि वेडावून घेण्याची तयारी ठेवलीच पाहिजे!" मी मनाशी म्हणालो, 'आपल्यावर त्याचा परिणाम होऊन दिला नाही म्हणजे झालं.' जरा थांबना' मी मेव्हणीस म्हणालो. 'उघड्या पायानी कशाला मूर्खासारखं जायचं. जरा पायात सपाता अडकवूं दे.'

## —— २८ ——

"तुम्हाला आश्चर्य वाटेल, पण माझ्या खोलीतून निघून निरनिराळी नेहमीच्या ओळखीची दालनं ओलांडीत असताना असं खरोखरीच घडलं नसेल अशी आशा मनांत चमकली;

पण लगेच आयडोफॉर्म, कॅरबॉलीक वगैरे औषधाचा तीव्र दर्प नाकात शिरला आणि हें भयंकर कृत्य घडलंय याची जाणीव झाली.

" खोलीतनं जाताना मोठी मुलगी भीतिनं टक लावून माझ्याकडे पहात होती. सर्वच्या सर्व—पाचही मुलं तिथं आहेत आणि माझ्याकडे पाहाताहेत असा मला भास झाला. मी तिच्या दरवाजाशी गेलों. मोलकरणीनं दरवाजा उघडला

" तिचं रक्तानं माखलेलं लुगडं खुर्चीवर पडलं होतं. जवळच अशा दृष्टीनं माझ्याच पलंगावर निजवलं होतं पाय वर करून ती कशी तरी झोपली होती. आगातलं पोलकं काढून टाकलं होतं, जखमेवर कापसाच्या पट्ट्या ठेवल्या होत्या. आयडोफॉर्मचा किळसवाणा वास सर्व खोलीभर पसरला होता. तिच्या सुजलेल्या तोंडाकडे माझं प्रथम लक्ष गेलं. नाक व डोळ्याचा भाग तर काळानीळा झाला होता. मला मागं खेचण्याचा प्रयत्न करीत असताना मी जो ठोसा लगावला त्याचाच हा परिणाम होता. सौंदर्याचं एकही चिन्ह शिल्लक नव्हतं, उलट विद्रूपपणाच भरला होता. मी दरवाज्यातच थबकून उभा राहिलो

" जा! जवळ जा ना?' तिची बहीण म्हणाली.

"बहुतेक तिला पश्चाताप झाला असेल' मी विचार केला. 'तिली क्षमा करावी का? आता मरणाच्या दारीं पडली आहे. दया दाखवणंच इष्ट आहे' उदारपणाचा आंव आणून मी मनांत ठरवलं.

" नंतर मी तिच्या कॉटजवळ गेलो. तिनं कष्टानं मान वर केली. माझ्याकडे पाह्यले आणि अडखळत तुटक बोलली ' झालं एकदाचं मनासारखं ! जीव घेतलात माझा, आता तरी समाधान झालं!' अगदीं मरणाच्या दारीसुद्धा तिच्या चेहऱ्यावर तोच पूर्वीचा द्वेषभाव मला दिसला. ' मुलं—ती मात्र तुम्हाला मिळणार नाहीत—मी तरी तुमच्या हवाली करणार नाही. ती ( तिची बहीण ) संभाळील त्याना.'

" मला जरी कितीही महत्त्वाचं वाटलं, तरीपण स्वतःच्या गुन्ह्याबद्दल तिनं चकारशद्बसुद्धा काढला नाहीं. त्याचा उल्लेख करण्याचीसुद्धा गरज तिला भासली नाही.

" खरंच, आपल्या हांतून केवढं अभिनंदनीय कृत्य झालंय नाहीं?' असं म्हणत तिनं आपले डोळे दरवाजाकडे वळवले आणि ती हुंदके देऊं लागली.' ' पहा! पोरक्या पोराकडे नजर टाका म्हणजे तुम्ही काय केलंत तें उमजेल. तुमचे डोळे उघडतील.'

"' मी मुलाच्याकडे पाहिलं आणि तिच्या चेहऱ्याकडे पाहिलं. आणि आयुष्यांत पहिल्यादाच माझा सर्व अभिमान गळाला. माझा अहंकार नाहीसा झाला तिच्यांतली माणुसकी माझा द्वेष, राग वगैरे किती इतर गोष्टी आहेत आणि त्याला बळी पडून किती भयंकर गोष्ट मी केली हें मनात आलं. तिथंच तिचे पाय धरून ' क्षमा कर ' म्हणावं असं वाटलं, पण धैर्य होईना. तिनं डोळे मिटले आणि तोंड बंद केलं. अशक्ततेनं

तिला पुढें बोलवेना. एकदम तिच्या विद्रूप चेहऱ्यावर आठी पडली आणि हातानं तिनं मला बाजूला सारलं ' हें का झालं? मला क्षमा कर ' मी एकदम म्हणालों. ' क्षमा ! नुसता कचरा आहे. ' जरा वर उठण्याचा प्रयत्न करीत ती म्हणाली तिचे डोळे इंगळासारखे दिसत होते. ' तुमच्या इच्छेप्रमाणं झालं, मी तुमचा द्वेष करते ' ती बरळूं लागली. तिच्या मनावरचा ताबा सुटूं लागला. " आता मला ठार मारा ! माझा खून करा. मी भीत नाहीं. फक्त सर्वांनाच ठार करा म्हणजे बरं. त्यालासुद्धां ठार करा. तो पळाला. तो सुटला " हा भ्रम शेवटपर्यंत टिकला. तिनं कोणालाच ओळखलं नाहीं त्याच दिवशी बारा वाजता तिनं प्राण सोडला.

" याच्याच पूर्वी सकाळीं आठ वाजता मला पोलीस चौकीत नेलं तिथून तुरुंगात पाठवलं. निकाल होईपर्यंत अकरा महिने मी तुरुंगात काढले. तिथं मी माझ्या गतआयुष्याच्या बद्दल विचार केला. त्यावेळी मला याचं खरं अंतरंग समजलं. तीन दिवसानंतर मला घरी नेलं''त्याला काही तरी सांगायचं होतं पण हुंदके आवरेनात म्हणून तो थांबला. पुन्हा बोलण्याचा प्रयत्न केला.

" खरोखरी तिचं प्रेत पाहताच मला सर्व गोष्टी नीट उमगल्या. तो हुंदके देत गडबडीनें बोलत होता. तिच्या निर्जीव चेहऱ्याकडे पाहताना मी काय केलं ते मला समजलं. मी— माझ्या हांतून—एका चालत्याबोलत्या जीवाला क्षणांत मातीत

मिळवलं आणि यापुढे मला कोठेही–कुणीही–कसलाही उपचार करणं शक्य नाही हे मला पटलं. ज्याला ह्याचा अनुभव नाहीं त्याला हे समजणार नाहीं हं. नंतर तो गप्प बसला.

बराच वेळ आम्ही गप्प बसलो. तो कुडकुडत हुंदके देत समोरच बसला होता. 'आता निरोप घेतो' असं म्हणत त्यानें आपली हकिगत संपवली.

